श्रीमद्भगवद्गीता 3 रा अध्याय

3 र्या अध्यायाचे नाव कर्मयोग असून त्यात एकूण 43 श्लोक आहेत. कर्म माणसाला करावंच लागतं, पण कर्मामागील विचार किंवा ज्ञान हे कर्मापेक्षा श्रेष्ठ आहे. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे, कर्म केलं की कर्मबंधनांत अडकायची भीती आलीच. ज्ञानाचा मार्ग हा सांख्यासाठी म्हणजे ज्ञानी लोकांसाठी आहे तर कर्माचा मार्ग हा सर्वसाधारण योग्यांसाठी आहे. कर्मयोगाची 4 महत्वाची वैशिष्ट्ये म्हणजे

1. कर्तव्य

2. नम्रता

3. निष्पक्षता आणि

4. निःस्वार्थ

ह्या अध्यायात आपण कर्मयोग समजून घेऊया.

अर्जुन उवाच

ज्यायसी चेतकर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन। तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव।।3.1।।

अर्जुन उवाच - हे जनार्दन ! बुद्धिः कर्मणः ज्यायसी ते मता चेत् , तत् हे केशव ! माम् घोरे कर्मणि किम् नियोजयसि ?

अर्जुन उवाच -

हे जनार्दन !

बुद्धिः ज्ञान बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

कर्मणः कर्मापेक्षा कर्मन् नपु. पं. ए. व.

ज्यायसी श्रेष्ठ ज्यायसी स्त्री. प्र. ए. व.

ज्या धातू वृद्ध (जेष्ठ) होणे

ते आपण युष्मद् ष. ए. व.

मता मानता मन् धातू विचार करणे क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

चेत् जर अव्यय

तत् तर तद् नपु. प्र. ए. व.

हे केशव !

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

घोरे घोर नपु. स. ए. व.

कर्मणि कर्म कर्मन् नपु. स. ए. व.

किम् का किम् नपु. द्वि. ए. व.

नियोजयसि प्रवृत्त करत आहात नि+युज् धातू प्रेरीत करणे णिच् प्रत्यय कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

2र्या अध्यायात श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला सांख्ययोग सांगितला. अर्जुनासाठी त्याचे कर्म म्हणजे युद्ध. युद्ध न करण्याची अर्जुनाची स्वतःची कारणे आहेतच. त्यातून ज्ञानयोग हा कर्मयोगापेक्षा श्रेष्ठ असे ऐकल्यानंतर सहाजिकच अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे विचारत आहे की

हे जनार्दन! जर आपले कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ असे मत आहे तर हे केशव! आपण मला असे घोर कर्म करण्यासाठी का प्रवृत्त करत आहात?

---

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे। तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्।।3.2।।

व्यामिश्रेण इव वाकयेन मे बुद्धिं मोहयसि इव । तत् एकं निश्चत्य वद , येन अहम् श्रेयः आप्नुयाम् ।

व्यामिश्रेण संदिग्ध व्यामिश्र नपु. तृ. ए. व.

वि+अ+मिश्र, मिश् धातू शब्द करणे

इव अशा अव्यय

वाक्येन वाक्यानी वाक्य नपु. तृ. ए. व.

मे माझ्या अस्मद् ष. ए. व.

बुद्धिम् बुद्धीला बुद्धि स्त्री. द्वि. ए. व.

मोहयसि भ्रमित करत आहात

मुह् धातू भ्रम होणे णिच प्रत्यय कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

इव अव्यय

तत् म्हणून तद् नपु. प्र. ए. व.

एकं एक पु. द्वि. ए. व.

निश्चित्य निश्चित निस् धातू +चि ल्यप प्रत्यय

वद सांगा वद् कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

येन ज्यामुळे यद् नपु. तृ. ए. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

श्रेयः श्रेयस्कर श्रेयस् नपु. द्वि. ए. व.

आप्नुयाम् प्राप्त होवो आप् धातू कर्तरि विधीलिङः लकार उ. पु. ए. व.

संस्कृत मध्ये अधिकारी ह्या शब्दाचा व्यापक अर्थ आहे. प्रत्येक व्यक्तिची श्रेणी, जो शास्त्र समजून घेण्यासाठी आणि त्याचे अध्ययन करण्यासाठी सक्षम आहे. वेदान्तसार ह्या ग्रंथात प्रमाता तु अधिकारी असे म्हटले आहे. प्रमाता म्हणजे ज्ञान प्राप्त करणारा पुरूष. 2र्या अध्यायात आपण आपल्याला कर्म करण्याचा अधिकार आहे पण त्याच्या फलितावर अधिकार नाही असे वाचले होते.

संपूर्ण श्रीमद्भगवद्गीतेमध्ये श्रीभगवानकृष्णांनी सर्व योगांचे वर्णन केले आहे म्हणजेच अर्जुन आणि अप्रत्यक्षपणे धृतराष्ट्र आणि संजय अधिकारी आहेत असे म्हणता येईल.

क्षत्रियाचा धर्म तर युद्ध करणे. युद्ध हे जिंकण्यासाठीच करायचे असते. पण आधीच्या अध्यायात निष्काम कर्म, बुद्धियोग, बुद्धियोग द्वारे इन्द्रियांवर नियंत्रण अशा निरनिराळ्या संकल्पना

सांगितल्या. ह्या गोष्टी एकाच वेळी ऐकून अर्जुनाच्या मनात संभ्रम निर्माण झाला. पण सर्व काही समजून घेणे त्याच्या साठी क्रमप्राप्त आहे. आणि आवश्यक सुद्धा. म्हणून तो ह्या श्लोकात असे म्हणत आहे की

आपल्या संदिग्ध बोलण्यामुळे माझ्या मनात संभ्रम निर्माण झाला आहे. म्हणून मला एकच गोष्ट ठामपणे सांगा ज्यामुळे माझे कल्याण होऊ शकेल.

---

श्री भगवानुवाच

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनम्।।3.3।।

भगवान श्रीउवाच - हे अनघ ! अस्मिन् लोके द्विविधा निष्ठा मया पुरा प्रोक्ता साङ्ख्यानम् ज्ञान -योगेन , योगिनाम् कर्म -योगेन ।

श्रीभगवान उवाच -

हे अनघ ! निष्पाप अन् अघ् धातू निंदा करणे

अस्मिन् इदम् पु. स. ए. व.

लोके लोक पु. स. ए. व.

द्विविधा द्विविधा स्त्री. प्र. ए. व.

धा धातू धारण करणे

निष्ठा निष्ठा स्त्री. प्र. ए. व.

नि+स्था धातू स्थिर असणे

मया अस्मद् तृ. ए. व.

पुरा अव्यय

प्रोक्ता प्र +वच धातू बोलणे क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

साङ्ख्यानम् साङ्ख्य नपु. ष. ब. व.

ज्ञान-योगेन  ज्ञान-योग पु. तृ. ए. व.

योगिनाम् योग पु. ष. ब. व.

कर्म -योगेन कर्म-योग पु. तृ. ए. व.

प्रकृती च्या प्रभावातून निर्माण झालेल्या ज्या 24 तत्वांना निर्धारित केले गेले आहे त्यांना सांख्य असे म्हटले जाते. आत्म-साक्षात्काराचे दोन प्रकार, साङःख्य आणि कर्म योग ह्या दोन्हीचा उल्लेख 2 अध्यायातील 39व्या श्लोकात करून त्याचे विवेचन इतर श्लोकात केले आहे. ह्या श्लोकातील पुरा चा अर्थ 2 रा अध्याय असा घ्यावा का? ह्या श्लोकात जरी ज्ञानयोग आणि कर्मयोग वेगळे असून ते दोन प्रकारच्या व्यक्तींसाठी आहेत असे म्हटले असले तरी 5 व्या अध्यायातील 4 थ्या श्लोकात ते भिन्न नाहीत असे म्हटले आहे.

अर्जुनाच्या आधीच्या श्लोकातील बोलण्यावर आता श्रीभगवानकृष्ण उत्तर देताना असे म्हणतात की

हे अनघ! ह्या लोकात आत्मसाक्षात्कारासाठी दोन प्रकारचा अढळ विश्वासाबद्दल माझ्याकडून आधीच सांगितले आहे. वेदांत विज्ञा, ज्ञानपिपासू लोकांसाठी  आणि कर्मयोग भक्तांसाठी.

---

न कर्मणामरंभन्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते। न च संन्यासदेव सिद्धिं समधिगच्छति।।3.4।।

पुरुषः कर्मणाम्  अन् आरम्भात नैष्कर्म्यम् न अश्नुते । न च सन्न्यासनात् एव सिद्धिम् समधिगच्छति ।

पुरुषः पुरूष पु. प्र. ए. व.

कर्मणाम्  कर्मांचा कर्मन् नपु. ष. ब. व.

अन् आरम्भात आरंभ केल्या शिवाय

अन् आरम्भ पु. पं ए. व.

रभ् धातू आनंदी होणे

नैष्कर्म्यम् निःस्वार्थ नैष्कर्म्य नपु. द्वि. ए. व.

निस+कृ धातू करणे

न अव्यय

अश्नुते अनुभवतो अश् धातू प्राप्त करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

न अव्यय

च आणि अव्यय

सन्न्यासनात् (कर्माच्या) त्यागाने

सन्न्यासन नपु. पं. ए. व.

सम+नी +अस् धातू

एव केवळ अव्यय

सिद्धिम् सिद्धि स्त्री. द्वि. ए. व.

समधिगच्छति प्राप्त होत नाही

सम+अधि+गम् धातू जाणे

ह्या श्लोकातील कर्म, नैष्कर्म्य आणि सन्न्यासन ह्या शब्दांचा अर्थ जाणून घ्यायला हवा. आत्मदर्शन किंवा ईश्वराशी कसे जोडून घ्यायचे  हे सांगणं हा गीतातत्वज्ञानाचा पाया आहे. परमेश्वराला जोडून घेण्याच्या प्रक्रियेत त्या व्यक्तीचा अहंकार पूर्णपणे नाहीसा होतो. म्हणजेच तो कोणत्याही कर्मासाठी स्वतःला कर्ता मानत नाही. पण याचा अर्थ असा नाही की कर्म करायचेच नाही. कारण परमेश्वराला ही जीवसृष्टी चालू ठेवताना सर्व काही लोकांच्या मार्फतच घडवून आणायचे असते. थोडक्यात ज्यांना परमेश्वराला जोडून घ्यायचे आहे त्यांनी कर्मफळाची इच्छा न ठेवता सर्व कर्मे करायची आहेत. तर दुसरीकडे साङःख्य योगी कडे फक्त ज्ञान असून उपयोग नाही त्याचे आचरण सुद्धा तसेच असायला हवे. केवळ भौतिक पातळीवर कर्मांचा त्याग करून उपयोग नाही तर मनातून आसक्ती नाहीशी झाली पाहिजे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

कर्मांचा आरंभ केला नाही म्हणून काही निवृत्ती प्राप्त होणार नाही. आणि कर्मांचा केवळ (भौतिक पातळीवर) त्याग केला म्हणून पूर्णत्व प्राप्त होत नाही.

---

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्। कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः।।3.5।।

हि न कश्चित् जातु क्षणं अपि अ कर्म कृत तिष्ठति । हि सर्वः प्रकृतिजैः गुणैः अवशः कर्म कार्यते ।

हि नक्कीच अव्यय

न अव्यय

कश्चित् कोणीही किन्चित पु. प्र. ए. व.

जातु नेहमी अव्यय

क्षणं क्षण पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

अ-कर्म-कृत कर्म न करता

अ कर्मन् कृत पु. प्र. ए. व.

तिष्ठति राहणार स्था धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

हि कारण अव्यय

सर्वः सर्व पु. प्र. ए. व.

प्रकृतिजैः प्रकृतीतून उत्पन्न झालेल्या प्रकृतिज पु. तृ ब. व.

गुणैः गुणांच्या गुण पु. तृ. ब. व.

अवशः प्रभावातून अवश पु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

कार्यते केले जाते कृ धातू णिच् कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

कर्मबंधनातून मुक्ती मिळवण्यासाठी कर्माचा आरंभच करायचा नाही हा विचार कृतीत (नकारात्मक कर्म?) आणणे केवळ अशक्यच हे सांगणारा हा श्लोक. सक्रियता हा आत्म्याचा गुणधर्म, आणि आपल्या

सर्वांवर प्रकृतीचा अंमल असल्याने त्यामधून होणारी त्रिगुणांची निर्मिती परमेश्वर आणि माणसांमधील फरक दर्शवते.

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।

कार्यते ह्यवश: कर्म गुणै: स्वाभाविकैर्बलात् ॥ श्रीमद्भागवतम् ।6.1.53 ॥

कोणीही एकही क्षण कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. प्रत्येक जण आपापल्या प्रकृती नुसार कार्य करीत असतो.

माणसाच्या निरनिराळ्या अवस्था जसे जागृत, सुषुप्ति, स्वप्न, मूर्च्छा आणि अर्थात तुरिया. ह्या श्लोकातील जातु ह्या शब्दाची एवढी मोठी व्याप्ती असावी का? 18 व्या अध्यायाच्या 15 व्या श्लोकात शारीरिक, मानसिक आणि वाचिक क्रियांना कर्म असे म्हटले आहेच.

मराठीत वश करणे ह्याचा थोडा वेगळा अर्थ आहे. तरीही दोन काव्यांची सहज आठवण होते.

परवशता पाश दैवे

पराधीन आहे जगती पुत्र मानवाचा.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

कोणीही व्यक्ती क्षणभर सुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. कारण प्रकृती च्या प्रभावाखाली सर्वच जण आपापल्या प्रकृती नुसार कार्य करीत असतात.

---

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्।

इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते।।3.6।।

यः कर्म-इन्द्रियाणि संयम्य , मनसा इन्द्रियार्थं स्मरन् आस्ते , सः विमूढात्मा मिथ्याचारः उच्यते ।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

कर्म-इन्द्रियाणि कर्मेन्द्रिय कर्म इन्द्रिय नपु. द्वि. ब. व.

संयम्य संयमित ठेवून सम+यम् धातू ल्यप प्रत्यय

मनसा मनात मनस् नपु. तृ. ए. व.

इन्द्रियार्थं इन्द्रिय विषयक इन्द्रिय अर्थ पु. द्वि. ब. व.

स्मरन् विचार करत स्मृ धातू स्मरण करणे शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

आस्ते असतो आस् धातू बसणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

विमूढात्मा मूर्ख आत्मा विमूढ आत्मन् पु. प्र. ए. व.

मुह् धातू मूर्ख असणे

मिथ्याचारः ढोंगीवृत्ती मिथ्याचार पु. प्र. ए. व.

उच्यते म्हणतात वच् धातू बोलणे कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

मनात एक आणि ओठांवर एक ह्या वाक्याचा अर्थ येथे तंतोतंत लागू पडतो. आपली ज्ञानेन्द्रिये आणि कर्मेन्द्रिये मनाशी जोडलेली आहेत. जसे डोळ्यांनी आपण जे काही पाहतो त्याने आपल्याला वस्तूचे ज्ञान होते, ज्याचा संबंध बुद्धीशी आहे. डोळ्यांनी वाईट गोष्टी पाहून दुःख होते, चांगल्या गोष्टी पाहून आनंद होतो. वैद्यक शास्त्राच्या प्रगतीमुळे मृत माणसाचे डोळे अंध माणसाला दृष्टी देऊ शकतात. आणि त्या माणसाला त्याचे लाभ मिळतात. म्हणजे कर्मेन्द्रिय ही फक्त साधने आहेत, सर्व काही मनावर अवलंबून आहे. 4थ्या श्लोकातील 2र्या वाक्याचा अर्थ ह्या श्लोकात समजावून सांगितला आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो पुरुष आपल्या कर्मेन्द्रिये ताब्यात ठेवतो पण मनात मात्र त्याचेच विचार सुरू असतात अशा मूर्ख माणसाला ढोंगी म्हणतात.

---

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन।

कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते।।3.7।।

हे अर्जुन ! यः तु मनसा इन्द्रियाणि नियम्य , असक्तः कर्म-इन्द्रियैः कर्म-योगम् आरभते , सः विशिष्यते

हे अर्जुन !

यः जो यद् पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

मनसा मनाने मनस् नपु. तृ. ए . व.

इन्द्रियाणि इन्द्रियांना इन्द्रिय नपु. द्वि. ब. व.

नियम्य ताब्यात ठेवून नि+यम् धातू ल्यप प्रत्यय

असक्तः अनासक्त होऊन असक्त पु. प्र. ए. व.

कर्म-इन्द्रियैः कर्मेन्द्रियांद्वारे कर्म-इन्द्रिय पु. तृ. ब. व.

कर्म-योगम् कर्म योग कर्म-योग पु. द्वि. ए. व.

आरभते आचरण करतो आ+रभ् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

विशिष्यते श्रेष्ठ होय वि+शास् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आता ह्या श्लोकात कर्मयोग म्हणजे नक्की काय ते समजावून सांगितले आहे.

मनसा ह्या शब्दाचा व्यापक अर्थ घ्यायला हवा जसे मन बुद्धी चित्त अहंकार. तसेच इन्द्रियाणि म्हणजे सर्व कर्मेन्द्रिये आणि ज्ञानेन्द्रिये.

युद्धभूमीवर सांगितलेली गीता, अर्जुनाने युद्ध जिंकावे आणि त्यानंतर पांडवांनी राज्य करावे हे गृहीत धरून सांगितली आहे. राज्य करणे म्हणजे सर्व प्रकारचे सुख, सत्ता, आणि मानमरातब. अशा पाश्र्वभूमीवर कर्मयोगाचे स्वरूप कसे असायला हवे? ईशावास्योपनिषद मध्ये सांगितलेला पहिल्या श्लोकाचा उल्लेख करावासा वाटतो.

ॐ ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् । तेन त्यक्तेन भुंजीथा मा गृध: कस्य स्विद्धनम्।। 1।।

ह्या जगात जे काही आहे त्यावर ईश्वराचे आच्छादन आहे त्याचा तू उपभोग घे पण कोणाच्याही धनाची अभिलाषा ठेवू नकोस.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

परन्तु हे अर्जुन! जो पुरुष मनापासून सर्व इन्द्रियांवर ताबा ठेवून, अनासक्त होऊन कर्मेन्द्रियांद्वारे कर्मयोग साधतो तो श्रेष्ठ योगी मानला जातो.

---

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः। शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः।।3.8।।

त्वं नियतम् कर्म कुरु , अकर्मणः हि कर्म ज्यायः । ते शरीर-यात्रा च अपि अकर्मणः न प्रसिद्ध्येत्

त्वं तू युष्मद् प्र. ए. व.

नियतम् अनिवार्य नियत नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

कुरु कर कृ धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

अकर्मणः निष्क्रिय न कर्मन् नपु. पं. ए. व.

हि कारण अव्यय

कर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

ज्यायः श्रेष्ठ ज्यायस् नपु. प्र. ए. व.

ते युष्मद् ष. ए. व.

शरीर-यात्रा शरीर निर्वाह शरीर-यात्रा स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

अकर्मणः निष्क्रिय न कर्मन् नपु. ष. ए. व.

न अव्यय

प्रसिद्धयेत् सिद्ध होते प्र +सिध् धातू कर्तरि विधीलिडः प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात नियत कर्माचा उल्लेख केला आहे. आपल्या शरीराचे संगोपन करण्यासाठी आणि सामाजिक जबाबदारी म्हणून जी कर्मे करणे आवश्यक असते त्याला नियत कर्म असे म्हणतात. शास्त्रानुसार जी कर्मे करू नयेत असे म्हणतात ती निषिद्ध कर्मे व आपल्या कामनापूर्तीसाठी केली जाणारी कर्मे म्हणजे काम्य कर्मे यांचा त्याग करावा. नियत कर्म आपल्या वर्ण, आश्रम, स्वभाव आणि परीस्थितीनुसार कर्तव्य ह्या स्वरुपात केली जातात. 2र्या अध्यायातील 31 व्या श्लोकात, 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि।'

म्हणजे क्षत्रियाचे रक्षण करणे हे कर्तव्य असून त्याचा त्याग करता कामा नये असे म्हटले आहे.

सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।18.48 ।।

कर्म सदोष असली तरी त्याचा त्याग करू नये असे सुद्धा म्हटले आहे.

तमोगुणयुक्त व्यक्ती आळसापोटी आपले कर्म टाळण्याचा प्रयत्न करत असतो, जसे स्नान करण्याचा कंटाळा आला की तमोगुणी व्यक्ती माझे मन तर स्वच्छ आहे असे म्हणतात, हे सर्व पुढे वाचायला मिळेलच. काम करणे टाळण्याचा परीणाम म्हणजे लठ्ठपणा असे जर गृहीत धरले अकर्मणः प्रसिद्धयेत् ह्या शब्दांमुळे कुंभकर्णाची आठवण येते. अशी विपरीत (कु) प्रसिद्धी काय कामाची?

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

तू तुझे आवश्यक कर्म कर. कारण निष्क्रियतेपेक्षा कर्म करणे श्रेष्ठच. तसेच निष्क्रियतेमुळे शरीर निर्वाह सुद्धा होऊ शकणार नाही.

---

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।

तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचार।।3.9।।

यज्ञार्थात् कर्मणः अन्यत्र अयम् लोकः कर्म-बन्धनः । हे कौन्तेय! तदर्थम् मुक्त-सङ्गः कर्म समाचर।

यज्ञार्थात् यज्ञासाठी केले जाणारे यज्ञ-अर्थ पु. पं. ए. व.

कर्मणः कर्मा पेक्षा कर्मन् पु. पं. ए. व.

अन्यत्र इतर अव्यय

अयम् हे इदम् पु. प्र. ए. व.

लोकः जग लोक पु. प्र. ए. व.

कर्म-बन्धनः कर्म-बन्धन पु. प्र. ए. व.

हे कौन्तेय!

तदर्थम् त्यां साठी तद् अर्थ नपु. द्वि. ए. व.

मुक्त-सङ्गः आसक्ती रहीत मुक्त-सङ्ग पु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

समाचर (कर्तव्य) कर सम+आ+चर धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

नियत कर्माबद्दल आधीच्या श्लोकात सांगून झाल्यावर ह्या श्लोकात यज्ञ ह्या संकल्पनेचा उहापोह केला आहे. यज्ञ म्हणजे विष्णू. यः =यातः प्राप्त झालेला

ज्ञः विष्णू

ज्याच्या योगाने विष्णू प्राप्त होतो. त्याच्या अनुग्रहा साठी कर्म करायचे ते यज्ञकर्म. मनुष्याचे जीवित हा एक यज्ञच. कुपोषणामुळे होणारे मृत्यू आठवा. माणसाचे योग्य प्रकारे भरणपोषण करणे म्हणजे जणू एक यज्ञच. कितीतरी जण ह्यात हातभार लावत असतात. अगदी शेतात बी पेरण्यापासून ते आपल्या ताटात अन्न म्हणून समोर येईपर्यंत. म्हणूनच तर समर्थांनी म्हटले आहेच, 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञ कर्म'. हे अन्न जठराग्नी ला स्वाहा करायचे. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी केलेला यज्ञ, किती जणांच्या आहुती पडल्या गणतीच नाही. अशा या महान यज्ञात अहंकाराला काही स्थानच नाही. यज्ञाव्यतीरीक्त इतर कर्मे त्याज्य मानली की ह्या श्लोकाचा अर्थ स्पष्ट होतो.

गृहेश्वविश्तां चापि पुंसां कुशलकर्मणाम्।

माद्वारतात्यायमानां न बंधाय गृहा मताः ॥ श्रीमद्भागवतम् 4.30.19 ॥

गृहस्थाश्रमी असूनही सर्व कर्मांचे श्रेय परमेश्वराचे असे मानून जे जीवन जगतात ते कर्मबन्धनात अडकत नाहीत.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

यज्ञासाठी (कर्तव्यपालनासाठी) केलेल्या कर्मा व्यतिरिक्त अन्य कर्म करणारा पुरूष कर्मबंधनात सापडतो. म्हणून हे कौन्तेय! आसक्ती रहीत होऊन केवळ कर्तव्य पालन कर.

---

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।

अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्।।3.10।।

पुरा प्रजापतिः सह-यज्ञाः प्रजाः सृष्ट्वा उवाच ' अनेन प्रसविष्यध्वम् , एषः वः इष्ट-कामधुक् अस्तु '।

पुरा कल्पाच्या पूर्वी (प्राचीन) अव्यय

प्रजापतिः ब्रह्मदेव प्रजापति पु. प्र. ए. व.

सह-यज्ञाः यज्ञासहित सह-यज्ञ पु. प्र. ब. व.

प्रजाः प्रजा स्त्री. द्वि. ब. व.

सृष्ट्वा उत्पन्न करून सृज् धातू उत्पन्न करणे क्त्वा प्रत्यय

उवाच म्हटले वच् धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

अनेन ह्या द्वारे इदम् पु. तृ. ए. व.

प्रसविष्यध्वम् वृद्धि होवो प्र+सू धातू उत्पन्न होणे कर्तरि लृट लकार आत्मनेपदी म. पु. ब. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

वः तुम्हाला युष्मद् द्वि. ब. व.

इष्ट-कामधुक् इच्छित फलदायी इष्ट-कामधुक् स्त्री. प्र. ए. व.

इष्टान कामान दोग्धि

इष् धातू इच्छा करणे

अस्तु होवो अस् धातू कर्तरि लोट लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकातील प्रजा आणि प्रजापति ह्या शब्दांचे अर्थ समजून घ्यायला हवे. ब्रह्मदेवाने पूर्ण सृष्टी निर्माण केली, त्यामध्ये पशुपक्षी आणि वृक्ष सुद्धा आले. पण ह्या श्लोकाच्या अर्थानुसार प्रजा म्हणजे माणसे असे अपेक्षित असावे (कारण जंगलांची वाढ होण्यामागे माणसांचा काहिच सहभाग नाही.)

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

प्रजापतीने कल्पाच्या पूर्वी यज्ञाच्या साह्याने प्रजा उत्पन्न करून असे म्हटले की तुम्ही या यज्ञाद्वारे आपला उत्कर्ष करून घ्या. ह्याने तुमचे मनोरथ पूर्ण होवो.

---

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः। परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ।।3.11।।

अनेन देवान् भावयत , ते देवाः वः भावयन्तु , संयुक्तं भावयन्तः परम् श्रेयः अवाप्स्यथ ।

अनेन या यज्ञाद्वारे इदम् पु. तृ. ए. व.

देवान् देवतांना देव पु. द्वि. ब. व.

दिव् धातू चमकणे

भावयत प्रसन्न करून भू धातू होणे णिच् कर्तरि लोट लकार म. पु. ब. व.

परस्परम् अव्यय

ते ते सर्व तद् पु. प्र. ब. व.

देवाः देवता देव पु. प्र. ब. व.

वः तुम्हाला युष्मद् द्वि. ब. व.

भावयन्तु उन्नत करो भू धातू णिच् कर्तरि लोट लकार प्र. पु. ब. व.

भावयन्तः उन्नती करून भू धातू णिच् शतृ प्रत्यय पु. प्र. ब. व.

परम् श्रेष्ठ पर नपु द्वि. ए. व.

श्रेयः कल्याण श्रेयस् नपु. द्वि. ए. व.

अवाप्स्यथ प्राप्त होईल अव+आप धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

हा श्लोक वाचल्यावर एकमेका सहाय्य करू अवघे धरू सुपंथ ह्या उक्ती ची आठवण येते. आजच्या पर्यावरणाचा ऱ्हास झालेल्या पार्श्वभूमीवर सर्वांनी जाणून घ्यायला हवा असा श्लोक. पंचमहाभूते जसे जल वायू तेज आकाश आणि पृथ्वी ह्याशिवाय आपले जगणे अशक्य आहे. ह्या पंचमहाभूतांनाच देवता मानले जाते. ब्रह्मदेवाने विश्वनिर्मिती केल्यानंतर आपले जीवन सुरळीत चालू रहावे ह्या साठी सांगितलेला कानमंत्रच जणू. आपले पर्यावरण सुरक्षित ठेवले तर आपल्याला फायदा होणार आहे हे महर्षी व्यासांनी लिहून ठेवले आहे हे विशेष.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की (आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन) या यज्ञाद्वारे तुम्ही देवतांची उन्नती करा आणि देवता सुद्धा तुम्हाला उपकारक ठरतील. अशा प्रकारे एकमेकांचा विकास करून कल्याण साधले जाईल.

---

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः।

तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः।।3.12।।

यज्ञ-भाविताः देवाः वः इष्टान्  भोगान्  हि दास्यन्ते । तैः दत्तान् एभ्यः अप्रदय , यः भुङ्क्ते , सः स्तेनः एव।

यज्ञ-भाविताः यज्ञामुळे संतुष्ट झालेल्या यज्ञ-भावित पु. प्र. ब. व.

देवाः देवता देव पु. प्र. ब. व.

वः तुम्हाला युष्मद् च. ब. व.

इष्टान् सुखकारक इष्ट पु. द्वि . ब. व.

भोगान्  विषय सुख भोग पु. द्वि . ब. व.

हि नक्कीच अव्यय

दास्यन्ते देतील दा धातू देणे कर्तरि लृट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

तैः त्यांनी तद् पु. तृ. ब. व.

दत्तान् दिलेले दा धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ए. व.

एभ्यः त्यांना इदम् पु. च. ब. व.

अप्रदय परत न देणे न+प्र +दा धातू ल्यप प्रत्यय

यः जै यद् पु. प्र. ए . व.

भुङ्क्ते उपभोग घेतो भुज् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए . व.

स्तेनः चोर स्तेन पु. प्र. ए . व.

एव नक्की अव्यय

लहानपणी शाळेत निबंध लिहिल्याचे आठवते आहे सूर्य उगवलाच नाही तर. त्याची येथे आठवण झाली. ब्रह्मदेवाने सृष्टी निर्माण करून तिच्या पालनपोषणाची सुद्धा तजवीज करून ठेवली आहे. त्यामध्ये जराशी सुद्धा चूक होत नाही. आपण ह्याचे कायम स्मरण ठेवले पाहिजे. संपूर्ण गीतेत अहंकार टाकून देऊन परमेश्वराला शरण जा असे सांगितले आहे. परमेश्वराप्रती कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी फार मोठे काही करणे अपेक्षित नाही. 9व्या अध्यायातील 26 व्या श्लोकात देवतांना जे शक्य असेल ते अगदी साधीसुधी गोष्ट अर्पण केली तरी चालेल असे म्हटले आहे. देव भावाचा भुकेला असे जनाबाईंनी म्हटले आहे.

दहिभाताची उंडी लावीन तुज तोंडी हे आपापल्या माहित आहेच.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की यज्ञयागाने संतुष्ट देवतांच्या अनुग्रहाने जी सुखे मिळतात त्याप्रती कृतज्ञता व्यक्त न करता फक्त भोग घेणारे चोरच समजले पाहिजे.

---

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः। भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्।।3.13।।

यज्ञशिष्टा -अशिनः सन्तः सर्वकिल्बिषैः मुच्यन्ते । ये तु आत्म-कारणात् पचन्ति ते पापाः अघं भुञ्जते।

यज्ञशिष्टा -अशिनः यज्ञ करून शिल्लक राहिलेले अन्न खाणारे

यज्ञ शिष्टा अशिन् पु. प्र. ब. व.

शिश् धातू शिल्लक राहणे

अश् धातू भोजन करणे

सन्तः भक्त सन्त पु. प्र. ब. व.

अस् धातू असणे

सर्वकिल्बिषैः सर्व पापापासून सर्वकिल्बिष नपु. तृ. ब. व.

मुच्यन्ते मुक्त होतात मुच् धातू लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

ये जे यद् पु. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

आत्म-कारणात् स्वतःच्या लालसेपोटी

आत्मन् कारण नपु. पं. ए. व.

पचन्ति भोजन करतात पच् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

पापाः पापी पाप पु. प्र. ब. व.

अघं घोर अघ नपु. द्वि. ए. व.

भुञ्जते भोगतात भुज् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

श्रीमद्भगवद्गीतेतील श्लोक आपण आयुष्य कसे जगावे ह्याबद्दल उपदेश देतात. आधीच्या श्लोकात कोणत्याही कर्माचा अहंकार करू नये असे सांगितले होते. आता ह्या श्लोकात — "ठेविले अनंते तैसेचि रहावे चित्ती असू द्यावे समाधान" ह्या तुकारामांच्या श्लोकाची आठवण होते. आळशी लोकांना हा श्लोक फारच आवडू शकतो. पण ह्या श्लोकाचा गर्भित अर्थ समजून घ्यायला हवा. थोडासा साम्यवादाकडे

झुकणारा हा श्लोक. आपण यज्ञ ह्या संकल्पनेबद्दल वाचले तेव्हा आपण अन्नग्रहणा मागचा हेतू जाणून घेतला होता. आता यज्ञाची कल्पना भांडवलदारांना लावून पाहिली तर यज्ञ संपन्न झाल्यावर जे काही शिल्लक राहिले तो नफा असे म्हणता येईल. म्हणजे नफेखोरी करण्याच्या वृत्तीवर ह्या श्लोकात टिका केली आहे. वैयक्तिक आयुष्यात यज्ञ (प्रयत्न) जरूर करावे पण त्यापेक्षा जास्त गोष्टींचा हव्यास धरू नये अस सांगण्याचा हेतू दिसत आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

यज्ञातील हविर्भागाची आहुति देऊन झाल्यावर शिल्लक पदार्थांचे जे सेवन करतात ते श्रेष्ठ आहेत, ते सर्व पापांपासून मुक्त आहेत. जे स्वतः च्या स्वार्थासाठी भोग निर्माण करतात ते पापरूपी भोग सेवन करतात.

---

अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः।

यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः।।3.14।।

भूतानि अन्नात् भवन्ति , अन्न-संभवः पर्जन्यात् , पर्जन्यः यज्ञात् भवति , यज्ञः कर्म-समुद्भवः

भूतानि सर्व सजीव भूत नपु. प्र. ब. व.

अन्नात् अन्नापासून अन्न नपु. पं. ए. व.

भवन्ति वाढतात भू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

अन्न-संभवः अन्न निर्मिती अन्न-संभव पु. प्र. ए. व.

पर्जन्यात् पर्जन्यामुळे पर्जन्य पु. पं. ए. व.

पर्जन्यः पाऊस पर्जन्य पु. प्र. ए. व.

यज्ञात् यज्ञामुळे यज्ञ पं. ए. व.

भवति होतो भू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

यज्ञः यज्ञ पु. प्र. ए. व.

कर्म-समुद्भवः कर्तव्यातून उद्भव कर्मन् समुद्भव पु. प्र. ए. व.

ह्या श्लोकात निसर्गचक्राचे वर्णन केले आहे. आताच्या सारखे पाणी प्रदूषण होण्याची समस्या त्या काळात असण्याचे कारण नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

सर्व सजीव अन्नामुळे उत्पन्न होतात. अन्नधान्य पावसामुळे तयार होते. पर्जन्य यज्ञामुळे तर यज्ञ कर्मांमुळे घडतो.

---

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्।

तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्।।3.15।।

कर्म ब्रह्म -उद्भवं विद्धि , ब्रह्म अक्षर-समुद्भवम् , तस्मात्  सर्वगतं ब्रह्म यज्ञे नित्यं प्रतिष्ठितम् ।

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

ब्रह्म -उद्भवं वेदांतून उत्पन्न झालेले

ब्रह्मन् उद्भव पु. द्वि. ए. व.

विद्धि जाणून घे विद् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

ब्रह्म वेद ब्रह्मन् नपु. द्वि. ए. व.

अक्षर-समुद्भवम् अविनाशी परमात्म्यापासून उत्पन्न असे अक्षर-समुद्भव पु. द्वि. ए. व.

तस्मात्  म्हणून तद् पु. पं. ए. व.

सर्वगतं सर्व व्यापी सर्व गत नपु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

यज्ञे यज्ञात यज्ञ पु. स. ए. व.

नित्यं कायम नित्य नपु. द्वि. ए. व.

प्रतिष्ठितम् प्रस्थापित आहे प्र+स्था धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

वेद म्हणजे काही श्लोकांचा संग्रह नव्हे. वेद वाचून ते समजावून घेणे तुलनेने अवघडच आहे. त्यांना अपौरुषेय असे म्हटले जाते. वेद सांगितले महापुरुषांनी जे परमात्म्याशी एकरूप झालेले होते. वेद मार्गदर्शक आहेत. वेदांशिवाय केलेल्या कोणत्याही कार्याला विकर्म, अनधिकृत किंवा पापकर्म म्हटले जाते. वेदांत सांगितलेली तत्वे परमात्म्याच्या श्वासातून निर्माण झाली असा उल्लेख आहे.

अस्य महतो भूतस्य निश्वासितम् एतद् यद्ऋग्वेदी यजुर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरस।।बृहद-आरण्यक। 4.5.11।।

चार ही वेद-ऋग्वेद, यर्जुवेद, सामवेद, अथर्ववेद परम पुरुषोत्तमाच्या श्वासातून निर्माण झाले आहेत. "

(आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन) यज्ञ म्हणजे कर्तव्यांचा उपलक्षक.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की कर्मांचे मूळ वेद आहेत हे तू जाणून घे. जे अ-क्षर म्हणजे अविनाशी आहेत म्हणूनच ते सर्वव्यापी असे असून यज्ञात (कर्तव्यकर्मात) सामावलेले आहेत.

---

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः।

अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति।।3.16।।

हे पार्थ! यः इह एवं प्रवर्तितम् चक्रम् न अनुवर्तयति, अघायुः इन्द्रिय-आरामः सः मोघम् जीवति।

हे पार्थ!

यः जो यद् पु. प्र. ए. व.

इह ह्या लोकात अव्यय

एवं अशाप्रकारे अव्यय

प्रवर्तितम् प्रचलित प्र +वृत् धातू क्त प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

चक्रम् कालचक्र चक्र नपु. द्वि. ए. व.

न अव्यय

अनुवर्तयति अनुसरतो अनु+वृत् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अघायुः पापी अघायुस् पु. प्र. ए. व.

अघ् धातू पाप-करणे

आयुस् जीवन

इन्द्रिय-आरामः भोगवादी इन्द्रिय-आराम पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु प्र. ए. व.

मोघम् व्यर्थ मोघ नपु. द्वि. ए. व.

मुह् धातू विचलित होणे

जीवति जगतो जीव् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात निसर्गचक्राचे वर्णन केले होते. आता कालचक्राचा उल्लेख केला आहे. आपल्या आयुष्यात काही ध्येय असावे आणि आपले आयुष्य व्यर्थ जाऊ नये. श्रीमद्भगवद्गीतच तीन प्रकारचे योग सांगितले आहेत कर्मयोग भक्तीयोग आणि ज्ञानयोग. म्हणजे प्रत्येकाला निवडीला वाव आहे. आधीच्या श्लोकात आपण यज्ञ करण्याचे महत्त्व समजावून घेतले. आपल्या आयुष्यात काही विशिष्ट ध्येय असेल तर विलासी वृत्ती आपोआपच लोप पावते.

ह्या श्लोकात ध्येयवादी असण्याचाच सल्ला दिला आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की जो ह्या लोकांत प्रचलित असणाऱ्या कालचक्रानुसार अनुकरण करत नाही, हे पार्थ! त्या भोगवादी पापी मनुष्याचे जीवन व्यर्थच आहे.

---

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।

आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते।।3.17।।

यः मानवः तु आत्म-रतिः एव , आत्म -तृप्तः च , आत्मनि एव सन्तुष्टः च स्यात्  तस्य कार्यम्  न विद्यते

यः जो यद् पु. प्र. ए. व.

मानवः मनुष्य मानव पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

आत्म-रतिः आत्म्यात (स्वतःमध्ये) रमणारा आत्मन् रति स्त्री. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

आत्म -तृप्तः आत्म तृप्त आत्मन् तृप्त पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

आत्मनि स्वतःमध्ये आत्मन् पु. स. ए. व.

एव हि अव्यय

सन्तुष्टः सम+तुष् धातू पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

स्यात् असतो अस् धातू कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

तस्य त्याचे तद् पु. ष. ए. व.

कार्यम् कर्तव्य कार्य नपु. प्र. ए. व.

न विद्यते अस्तित्वात रहात नाही विद् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

हा श्लोक संन्यासींना लागू पडेल असे वाटते. कर्तव्य म्हणजे duty जे due आहे ते करणे. मराठीत दायित्व. आधीच्या श्लोकात आपण वेदांत सांगितलेले यज्ञ करावे म्हणजेच आपले कर्तव्य पार पाडावे असे म्हटले होते. तसेच आयुष्य म्हणजे ध्येयापासून विचलित न होणे हे आधीच्या श्लोकात आपण वाचले. असे करताना आपण हळूहळू परमात्म्याशी जोडले जात असतो. हाच तो कर्मयोग. हळू हळू सर्व बंधने संपुष्टात येतात. ध्येयपूर्ती होत असताना उरतो फक्त परमात्म्याशी संवाद, त्याचा आनंद काय वर्णावा? आता कोणतेही दायित्व नाही आणि कर्तव्य सुद्धा नाही.

प्रणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजान्विद्वान्भवते नातिवादी । आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥मुण्डकोपनिषद् 3.1.4॥

सर्व भूतामात्रांद्वारा प्रकाशणार्या प्राणाला (ईश्वराला) जाणल्यावर ज्ञानी पुरुष निष्फळ बडबड करणारा रहात नाही. आत्म्यातच क्रिडा करणारा, आत्मसंतुष्ट असा क्रियावान ब्रह्मवेत्त्यांमधे सर्वश्रेष्ठ असतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

जो मनुष्य केवळ स्वतःमध्येच रममाण आहे, ज्याला आत्मिक समाधान आणि आत्म संतुष्टि आहे त्याचे कर्तव्य अस्तित्वात रहात नाही.

---

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्िचदर्थव्यपाश्रयः।।3.18।।

तस्य इह कृतेन न कश्चन अर्थः , न अकृतेन एव च, न अस्य सर्व-भूतेषु कश्चित् अर्थ -व्यपाश्रयः

तस्य त्याचा तद् पु. ष. ए. व.

इह ह्या लोकात अव्यय

कृतेन कर्म करण्याशी कृत नपु. तृ ए. व.

न अव्यय

कश्चन कोणतेही किञ्नन् पु. प्र. ए. व.

अर्थः प्रयोजन अर्थ पु. प्र. ए. व.

न अव्यय

अकृतेन कर्म न करण्याशी अ+कृतेन कृत नपु. तृ ए. व.

एव हि अव्यय

च सुद्धा अव्यय

न अव्यय

अस्य त्याचा इदम् पु. ष. ए. व.

सर्व-भूतेषु सर्व जीवांशी सर्व भूत नपु. स. ब. व.

कश्चित्  जरासुद्धा किञ्चित् पु. प्र. ए. व.

अर्थ-व्यपाश्रयः हेतू प्रयोजन  अर्थ-व्यपाश्रय पु. प्र. ए. व.

वि+अप+श्रि धातू सेवा करणे

मनुष्य हा समूहात राहणारा प्राणी आहे असे आपल्या मनावर ठसवलेले असते. श्रीमद्भगवद्गीतेत मात्र असे कुठेही म्हटलेले नाही. खर्या अर्थाने आत्मनिर्भरता येथे वाचायला मिळते. आपले नित्य व्यवहार देवाणघेवाण ह्या स्वरुपाचेच असतात. आपण सर्वच कामनापूर्तीसाठी कर्म करत असतो. त्यामुळेच आपल्याला दायित्व वगैरे संकल्पना सांगितल्या जातात. आत्मसाक्षात्कारी व्यक्ति मात्र फक्त परमेश्वराला मानतो. त्याचेच वर्णन ह्या श्लोकात केले आहे.

वासुदेवे भगवती भक्तिं उद्वहतां नृणां

ज्ञान-वैराग्य-वीर्याणां न हि कश्चिद् व्यपाश्रयः।। श्रीमद्भागवतम्। 6.17.31।।

भगवान वासुदेव कृष्णाच्या भक्तीत लीन असणाऱ्या व्यक्तीला स्वाभाविकपणे ह्या भौतिक संसाराचे पूर्ण ज्ञान आणि वैराग्य प्राप्त होते. म्हणूनच अशा व्यक्तींना संसारातील तथाकथित सुख आणि दुःख ह्यामधे कोणतीच रुचि नसते.

आधीच्या श्रीमद्भागवतातील श्लोकात व्यपाश्रय हा शब्द वापरला आहे ह्या श्लोकात अपाश्रयः हा शब्द वापरला आहे. दोन्हीचा अर्थ पूर्ण शरणागती, पूर्ण आश्रय.

व्यतिरेकांवयो यस्य

जाग्रत स्वप्न सुषुप्तिषु

माया मयेषु तद् ब्रह्म

जीव वृत्तिस्व अपाश्रयः।। श्रीमद्भागवतम्। 12.7.19।।

परम सत्य आपल्या सर्व अवस्थांमध्ये विद्यमान आहे जसे जागृत चेतना सुषुप्ति, माया शक्तीने निर्माण झालेल्या सर्व गोष्टीत आहे. म्हणूनच ते सर्वांना कवेत घेणारे आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

ह्या जगात त्या पुरूषाचे कर्म करणे किंवा न करण्याचे काही प्रयोजन रहात नाही. तसेच इतर प्राणीमात्रांशी सुद्धा त्याचा काहीच संबंध नसतो.

---

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः।।3.19।।

तस्मात् सततम् असक्तः कार्यम् कर्म समाचर, हि असक्तः कर्म आचरन् पूरुषः परम्, आप्नोति।

तस्मात् म्हणून तद् नपु. पं. ए. व.

सततम् नेहमी अव्यय

असक्तः आसक्ती रहित असक्त पु. प्र. ए. व.

कार्यम् जे कराल ते कार्य नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

समाचर शास्त्रोक्त पद्धतीने सम+आङः+चर धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

हि कारण अव्यय

असक्तः आसक्ती रहीत असक्त पु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

आचरन् आचरण आङः+चर धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ब. व.

पूरुषः पूरुष पु. प्र. ए. व.

परम् श्रेष्ठ पर नपु. द्वि. ए. व.

आप्नोति प्राप्त होते आप धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

8 व्या श्लोकात नियत कर्माचा उल्लेख करून 17, 18 व्या श्लोकात योगींना करण्यासाठी कर्म उरतच नाही असे सांगितले. आता ह्या श्लोकात जे संन्यासी नाहीत पण परमात्म्याशी जोडून घेऊ इच्छितात अशा कर्मयोगीवर भाष्य केले आहे. आपण आपल्या कार्यालयात काम करतो तेथे आपल्याला सर्व सुविधा पुरविल्या जातात. ज्या कामाच्या वेळेपुरत्या असतात. कित्येक जण तेच डोक्यात ठेवून घरात वावरतात. घरातील कामे करणे त्यांना कमीपणाचे वाटते. श्रीमद्भगवद्गीतेत कोणत्याही गोष्टीप्रती आसक्ती ठेवू नये असे वारंवार सांगितले आहे. म्हणजे आपण काम तर मनापासून करणे अपेक्षित आहे पण त्यामुळे मिळणारे श्रेय, मानमरातब ह्याबद्दल आसक्ती ठेवू नये. भावनिक पातळीपेक्षा बौद्धिक पातळीवर घेतलेले निर्णय सहसा चुकत नाहीत.

ह्या श्लोकात वापरलेला तस्मात् हा शब्द आधीच्या श्लोकाशी संबंध दर्शवतो. आधीच्या श्लोकात मानसिक पातळीवरील आत्मनिर्भरतेचे वर्णन केले आहे. त्यापुढे श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

म्हणूनच तू सदैव अनासक्त होऊन प्रघातानुसार आचरण कर. कारण अनासक्त राहून कर्म करणार्या पुरुषालाच श्रेष्ठत्व प्राप्त होते.

---

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः। लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि।।3.20।।

जनक-आदयः कर्मणा एव संसिद्धिम् आस्थिताः। हि लोक-संग्रहम् सम्पश्यन् अपि कर्तुम् अर्हसि एव

जनक-आदयः जनक आदि पु. प्र. ब. व.

कर्मणा कर्मा द्वारे कर्मन् नपु. तृ. ए. व.

एव सुद्धा अव्यय

संसिद्धिम् सिद्ध संसिद्धि स्त्री. द्वि. ए. व.

सम+सिध् धातू

आस्थिताः स्थित असे आङः+स्था धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

हि म्हणून अव्यय

लोक-संग्रहम् सामान्य जन लोक-संग्रह पु. द्वि. ए. व.

सम्पश्यन् पाहून सम+दृश् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

कर्तुम् करण्यासाठी कृ धातू तुमून प्रत्यय

अर्हसि योग्य आहेस अर्ह धातू कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

एव सुद्धा अव्यय

आपल्याला जनक राजाचे नाव सीतेचे पिता म्हणून माहित आहे.

जन्+निच्च् +ण्वुल् म्हणजे उत्पन्न करणारा. जनक हा शब्द वापरून श्रीभगवानकृष्णांना नक्की काय सांगायचे आहे? योग आपल्यातच असतो, असे तर म्हणायचे नाही? महान व्यक्तींची चरित्रे बोध घेण्यासाठी वाचली जातात. ते आपल्या जीवन गाथे मधून धडे घालून देत असतात. स्वतः जनक, राजा असूनही भोगविलासा पासून लांब होता. आणि प्रजाहित दक्ष होता. अष्टावक्र गीतेत, आत्मसिदधि प्राप्त पुरूष असे त्यांचे वर्णन आहे. म्हणजेच राजा असूनही संन्यासी वृत्तीने जगणे शक्य आहे.

महाजनो येन गतः स पन्थाः।महाभारतवनपर्व 33.137 महान अधिकारींचे अनुकरण केले पाहिजे.

न त्वं द्विजोत्तम- कुलं यदि हात्मा- गोपं गोपता वृषः स्वर्हनेन स-सुनृतेन

प्रकार्य एव नङ्क्ष्यति शिवस तव देव पन्था लोकोऽग्राहीष्यद् ऋषभस्य हि तत् प्रमाणम्

श्रीमद्भागवतम् (3.16.23)

हे प्रभू आपण द्विजोत्तमांचे श्रेष्ठ रक्षक आहात. जर आपण यज्ञकर्म आणि सुवचनांनी त्यांचे रक्षण केले नाही तर ह्या मार्गाचा सामान्य लोकांकडून स्वीकार केला जाणार नाही जे आपण सांगितलेल्या मार्गावर कालक्रमण करतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

जनका सारख्या महापुरुषांनी देखिल कर्म करूनच परमसिद्धि प्राप्त केली. म्हणून सामान्य जनांना नजरेसमोर ठेवून तू सुद्धा तुझे कर्म करावेस.

---

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः। स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते।।3.21।।

श्रेष्ठः यत्  यत् आचरति इतरः जनः तत्  तत् एव । सः यत् प्रमाणम् कुरुते , लोकः तत् अनुवर्तते।

श्रेष्ठः श्रेष्ठ पु. प्र. ए. व.

यत्  यत् जे जे यद् नपु. द्वि. ए. व.

आचरति उदाहरण घालून देतो आङः+चर् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

इतरः  इतर पु. प्र. ए. व.

जनः लोक जन पु. प्र. ए. व.

तत्  तत् ते ते तद् नपु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

सः तो तद् पु. प्र. ए. व.

यत् जे यद् नपु. द्वि. ए. व.

प्रमाणम् मानक प्रमाण नपु. द्वि. ए. व.

कुरुते प्रस्तुत करतो कृ धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

लोकः लोक पु. प्र. ए. व.

तत् तद् ते ते नपु. द्वि. ए. व.

अनुवर्तते अनुसरण करतात अनु+वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात श्रेष्ठ मनुष्य असा उल्लेख आहे. उच्चपदस्थ व्यक्तीला श्रेष्ठ म्हणायचे की आत्मज्ञानी व्यक्तीला? उच्चपदस्थ व्यक्ति जर श्रेष्ठ असेल तर हा श्लोक दुर्योधनाला उद्देशून लिहिला आहे का?

म्हणून युद्ध करणे क्रमप्राप्त होते का? असा सुद्धा विचार करता येईल. झुंडीची मानसिकता अशी एक संकल्पना, ज्या मध्ये लोक आपला नेता सांगेल त्या प्रमाणे वागतात. म्हणून नेता असणे ही फार मोठी जबाबदारी.

ह्या श्लोकात हेच तर श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला सांगत आहेत. ते असे म्हणतात की

श्रेष्ठ व्यक्ती जे जे आचरण करतो इतर लोक तसेच वागतात. ते जे मानक घालून देतात लोक तसेच अनुकरण करतात.

---

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन।

नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि।।3.22।।

हे पार्थ! मे त्रिषु लोकेषु किञ्चन कर्तव्यम् न अस्ति , अवाप्तव्यम् अनवाप्तम् न कर्मणि एव च वर्ते ।

हे पार्थ!

मे माझे अस्मद् ष. ए. व.

त्रिषु तिन्ही त्रि पु. स. ब. व.

लोकेषु लोकांत लोक पु. स. ब. व.

किञ्चन काही सुद्धा किञ्चन् नपु. प्र. ए. व.

कर्तव्यम् विहित कर्म कृ धातू तव्यत प्रत्यय नपु. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति आहे अस् धातू असणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अवाप्तव्यम् प्राप्त करण्यासारखे अव+आप धातू तव्यत् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

अनवाप्तम् काहिच न मिळालेले न+अव+आप् धातू तव्यत् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

न अव्यय

कर्मणि कर्मामध्ये कर्मन् नपु. स. ए. व.

एव सुद्धा अव्यय

च सुद्धा अव्यय

वर्ते वागतो आहे वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी उ. पु. ए. व.

भारतीय तत्त्वज्ञान हे संपूर्णतः आपल्याला धर्मपालन म्हणजे कर्तव्यपालन करायला शिकवते. त्यातून श्रीभगवानकृष्णांना सुद्धा सुटका नाही. स्वतः परमात्म्याला ह्या इहलोकात का अवतार घेऊन यावे लागते ह्या प्रश्नाचे उत्तर येथे दिले आहे.

न तस्य कार्यं करणं च विद्याते न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते।परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया ।। श्वेताश्वतर उपनिषद्। 6.8।।

ईश्वराला काही च करण्यासारखे नसते. निराकार असा तो कोणतेच कार्य करू शकत नाही. त्याच्या सारखा किंवा त्याच्या पेक्षा मोठा कोणी नाही. तो अतिशय शक्तीशाली आणि ज्ञानी अनेक रूपांत अनुभवास येतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! ह्या तिन्ही लोकांमध्ये न मला कोणते कर्तव्य आहे न मला काही प्राप्त करून घ्यायचे आहे. तरीसुद्धा मी माझे कर्तव्य पार पाडतच आहे.

---

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः। मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः।।3.23।।

मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तन्ते । हे पार्थ यदि जातु अहं हि अतन्द्रितः कर्मणि न वर्तेयम्

मनुष्याः सामान्य लोक मनुष्य पु. प्र. ब. व.

सर्वशः सर्वप्रकारे अव्यय

मम माझा अस्मद् ष. ए. व.

वर्त्म मार्ग वर्त्मन् नपु. द्वि. ए. व.

अनुवर्तन्ते अनुसरण करतात अनु+वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

हे पार्थ

यदि जर अव्यय

जातु कदाचित अव्यय

अहं मी अस्मद् प्र. ए. व.

हि म्हणून अव्यय

अतन्द्रितः सतर्क अ+तन्द्रित पु. प्र. ए. व.

तन्द्र धातू

कर्मणि कर्म मार्गाचे कर्मन् नपु. स. ए. व.

न वर्तेयम् अनुसरण केले नाही वृत् धातू कर्तरि विधीलिङः आत्मनेपदी उ. पु.ए. व.

कृष्णनीती हा संपूर्णतः अभ्यासाचा वेगळा विषय आहे. श्रीभगवानकृष्णांची निरनिराळी विशेषणे आपल्याला माहीत आहेत जसे रणछोडदास. रणांगणापासून पळून जाणे कृष्णासाठी अपमानास्पद होतेच तरीही आपल्या बांधवांच्या रक्षणासाठी तसे करणे योग्य होते. कारण तेच श्रीभगवानकृष्णांचे कर्तव्य होते. श्रीभगवानकृष्णांनी केलेल्या अनेक विवाहांबद्दल लोकांना आश्चर्य वाटते पण त्यामागची कर्तव्य भावना समजून घ्यायला हवी.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे पार्थ! सामान्य माणसे मी घालून दिलेल्या मार्गाचे अनुकरण करतात. जर मी सावधान राहून माझे कर्म न करून कसे चालेल?

---

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्। सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः।।3.24।।

अहम् कर्म न कुर्याम् चेत् इमे लोकाः उत्सीदेयुः, सङ्करस्य कर्ता च स्याम् इमाः प्रजाः उपहन्याम्।

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु द्वि. ए. व.

न अव्यय

कुर्याम् केले कृ धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ए. व.

चेत् जर अव्यय

इमे हे इदम् पु. प्र. ब. व.

लोकाः लोक पु. प्र. ब. व.

उत्सीदेयुः नाश पावतील उत+सद् धातू कर्तरि विधीलिङः प्र. पु. ब. व.

सङ्करस्य वर्णसङ्कर सङ्कर पु. ष. ए. व.

कर्ता करविता कर्तृ पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

स्याम् होईल अस् धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ए. व.

इमाः हे सर्व इदम् स्त्री. द्वि. ब. व.

प्रजाः प्रजा स्त्री. द्वि. ब. व.

उपहन्याम् नष्ट होतील उप+हन् धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ए. व.

वर्णसङ्कर ह्या शब्दाचा आजच्या काळाप्रमाणे अर्थ लावून हा श्लोक अभ्यासायला हवा. श्रीमद्भगवद्गीतेत कुठेच जाती आणि धर्म यांचा उल्लेख नाही. त्या दृष्टीने 1.41 हा श्लोक महत्वपूर्ण आहे. युद्धात मरण पावलेल्या सैनिकांच्या मागे त्याच्या कुटुंबाची वाताहात होऊन संभ्रमित संतती निर्माण होते असे म्हटले आहे.

आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन हा श्लोक समजून घ्यायला हवा. (3.21) जर तुमचे राज्यकर्तेच प्रजेला मारक ठरत असतील तर वर्ण-संकर होण्याची शक्यता वाढतेच. आदर्श कुटुंब, जबाबदार आईवडील त्यांचे मुलांवर होणारे संस्कार आणि भ्रष्ट आचरण करणारी माणसे (जी आपल्या नेत्यांचे अनुकरण करतात) ह्यामधे फरक दिसून येणारच. त्या दृष्टीने ही अवांछनीय माणसे आहेत. आतासारखे निवडणुकांच्या

माध्यमातून सरकार बदलण्याची सोय नसल्याने युद्ध हाच एकमेव पर्याय असे मानले तर युद्धाची अपरिहार्यता लक्षात येते. ह्या श्लोकात अजूनही श्रीभगवानकृष्ण स्वतः च्या कर्तव्यकर्मा बद्दल बोलत आहेत. ह्या श्लोकात ते असे म्हणतात की

मी जर माझे नियत कर्म केले नाही तर हे समस्त लोक नष्ट होऊन जातील. आणि मी अवांछित लोकांच्या अस्तित्वाचे कारण ठरेन सर्वांच्याच विनाशाचे कारण ठरेन.

---

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।

कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्िचकीर्षुर्लोकसंग्रहम्।।3.25।।

हे भारत! कर्मणि सक्ताः अविद्वांसः यथा कुर्वन्ति , असक्तः विद्वान् लोक-संग्रहम् चिकिर्षुः तथा कुर्यात्

हे भारत!

कर्मणि कर्मात कर्मन् नपु. स. ए. व.

सक्ताः आसक्ती ठेवून सक्त पु. प्र. ब. व.

अविद्वांसः अज्ञानी न विद्वस् पु. प्र. ब. व.

यथा जसे अव्यय

कुर्वन्ति कर्म करतात कृ धातू कर्तरि लट लकार प्र पु. ब. व.

असक्तः आसक्ती रहीत असक्त पु. प्र. ए. व.

विद्वान् विद्वान विद्वस् पु. प्र. ए. व.

लोक-संग्रहम् लोक संग्रह पु. द्वि. ए. व.

चिकिर्षुः अपेक्षा ठेवून चिकिर्षु पु. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

कुर्यात् करावे कृ धातू कर्तरि विधीलिङः प्र पु. ए. व.

ह्या श्लोकात अविद्वांस म्हणजे अज्ञानी लोक असा सरसकट अर्थ न घेता तो अध्यात्मिक अंगाने घ्यायला हवा. म्हणजेच असे लोक आपल्या कामात तत्पर आहेत आणि आपल्या कर्माच्या यश अपयशाचा संबंध ते त्याच्या मिळणाऱ्या श्रेयाची जोडतात. अशी आसक्ती ठेवून कर्म करणे हे अज्ञान. अर्थातच अतिशय निष्ठापूर्वक ते काम करतात. पण भगवंतांना असे लोक अपेक्षित नाहीत. आपण केलेल्या कर्मफळाची इच्छा ठेवू नये असे श्रीमद्भगवद्गीतेत वारंवार सांगितले आहे. आसक्ती रहीत कर्म करत असताना कधी कधी आपल्या कर्माकडे दुर्लक्ष होण्याची पण शक्यता असते. हे असे होऊ नये हे सांगण्याचा उद्देश ह्या श्लोकात दिसून येतो.

म्हणजे आपण काम तर निष्ठापूर्वक करावे पण त्याबद्दल आसक्ती असू नये.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे भारत! कर्मात आसक्त असलेले अज्ञानी जसे आपले कर्म करतात तसेच विद्वान पुरूषांनी असक्त राहून लोकसंग्रहाची अपेक्षा ठेवून कर्म करावे.

---

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम्।

जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन्।।3.26।।

युक्तः विद्वान कर्म-सङ्गिनाम् अज्ञानम् बुद्धि -भेदम् न जनयेत् समाचरन् सर्व -कर्माणि जोषयेत् ।

युक्तः युज् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

विद्वान विद्वस् पु. प्र. ए. व.

कर्म-सङ्गिनाम् कर्मा मध्ये आसक्ती असलेला कर्मन् सङ्गिन नपु. ष. ब. व.

अज्ञानाम् अज्ञानी अ ज्ञानाम् पु. ष. ब. व.

बुद्धि -भेदम् विचलीत बुद्धी बुद्धि -भेद पु. द्वि. ए. व.

न अव्यय

जनयेत् करावे जन् धातू कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

समाचरन्  आचरण करून सम+आङः+चर् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

सर्व -कर्माणि सर्व कर्मे सर्व कर्मन् नपु. द्वि. ब. व.

जोषयेत् नियोजित करावी जुष् धातू सेवा करणे कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

प्रत्येकाची ज्ञान ग्रहण करण्याची आपापली क्षमता असते. हे अगदी शाळकरी मुलांमध्ये सुद्धा दिसून येते.

तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता ।

मत्कथाश्रवणदौ वा श्रद्धा यावन्न जायते ॥श्रीमद्भागवतम् ।11.20.9॥

मनुष्याने आपली नियत कर्मे करत राहिली पाहिजेत जोपर्यंत त्याच्या मनात विरक्ति आणि परमेश्वराप्रती संलग्नता, उत्कट भावना विकसित होत नाही.

आदर्श मार्गदर्शक कसा असावा ह्याचे वर्णन ह्या श्लोकात केले आहे.

आधीच्या श्लोकात कर्माबद्दल आसक्ती असणाऱ्या लोकांप्रमाणे निष्ठापूर्वक कर्म करण्यास सांगितले होते. आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की ज्ञानी व्यक्तीने (आसक्ती असलेल्या) अज्ञानी माणसांचा बुद्धिभेद करू नये. स्वतः सम्यक आचरण करून त्यांना प्रेरीत करावे.

---

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः।

अहङ्कारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते।।3.27।।

कर्माणि सर्वशः प्रकृतेः गुणैः क्रियामाणानि अहंकार-विमूढ़-आत्मा 'अहम्' कर्ता इति मन्यते ।

कर्माणि कर्मांचा कर्मन् नपु. प्र. ब. व.

सर्वशः सर्वथा अव्यय

प्रकृतेः प्रकृती च्या प्रकृति स्त्री. ष. ए. व.

गुणैः गुणांनी गुण पु. तृ. ब. व.

क्रियामाणानि केली जाणारी कृ धातू यक् प्रत्यय डुकृञ नपु. प्र. ब. व. अहंकार-विमूढ़-आत्मा अहंकाराने मोहीत झालेला आत्मा अहंकार-विमूढ़-आत्मन् पु. प्र. ए. व.

'अहम्' मी अस्मद् प्र. ए. व.

कर्ता करणारा कर्तृ पु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

मन्यते मानतो मन् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात ज्ञानी आणि अज्ञानी लोकांच्या कामाच्या पद्धतीमागे काय विचार असतात ते आपण वाचले. अज्ञानी व्यक्ती त्यांच्या केलेल्या कर्माच्या कर्मफळाची इच्छा ठेवून, कर्म करत असतात. हे असे का घडते ते ह्या श्लोकात सांगितले आहे. प्रकर्षेण करोति इति प्रकृतिः' अर्थात् जे (सृष्टीतील पुरुषाव्यतिरिक्त सर्व अन्य तत्त्वांना) उत्पन्न करते, ते तत्त्व म्हणजे प्रकृती होय.प्रकृती या संकल्पनेचा उगम श्वेताश्वतर उपनिषदात आढळतो (4.5 आणि 4.10).या उपनिषदात प्रकृतीला 'अजा' म्हणजे कोणापासूनही जन्माला न आलेली असे म्हटले आहे. प्रकृती ही अनादि आणि सर्वांचे मूळ कारण असल्यामुळे तिला उत्पन्न करणारे दुसरे कारण नाही. 'अव्यक्त' अशा या प्रकृतीपासून सर्व 'व्यक्त' पदार्थ निर्माण होतात. सांख्यदर्शनानुसार सत्त्व, रज आणि तम हे त्रिगुण जेव्हा साम्यावस्थेत असतात, त्या अवस्थेलाच प्रकृती हे नाव आहे (सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृतिः| सांख्यसूत्र १.६१).

सांख्यदर्शनानुसार प्रकृतीपासून अन्य २३ व्यक्त तत्त्वांची उत्पत्ती (बुद्धी अहंकार मन 5 तन्मात्रा 5 महाभूते, 5 ज्ञानेन्द्रिये 5 कर्मेन्द्रिये) होते.

प्रकृतीला मूलप्रकृती, अहेतुमत्, प्रधान, अव्यक्त असेही म्हटले जाते. 23 तत्त्वांची उत्पत्ती करणारी ती मूलप्रकृती, तिच्या उत्पत्तीला दुसरे कारण, हेतु नसल्यामुळे ती अहेतुमत् आणि इंद्रियांना न दिसणारी असल्यामुळे तिला अव्यक्त असे म्हटले आहे. तसेच सर्व 23 तत्त्वे तिच्यातच विलीन होत असल्यामुळे तिला 'प्रधान' असे म्हणतात.

प्रकर्षेण धीयते स्थाप्यते अत्र अखिलम् इति प्रधानम्| सगळे जग प्रलयकाली जिच्यात संपूर्णतः ठेवले जाते ते प्रधान होय.

जो पुरूष आणि प्रकृति मधला फरक जाणतो तो ज्ञानी.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

प्रकृतीच्या अंगभूत गुणांमुळे सर्वथा होत असलेली कार्ये मीच करतो आहे असे अहंकारी मोहग्रस्त (अज्ञानी) पुरूषास वाटते.

---

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः। गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते।।3.28।।

हे महाबाहो! गुण-कर्म-विभागयोः तत्त्ववित् तु 'गुणाः गुणेषु वर्तन्ते' इति मत्वा न सज्जते

हे महाबाहो! महाबाहू गुण-कर्म-विभागयोः गुण आणि कर्म ह्यातील फरक गुण-कर्मन् -विभाग पु. ष. द्वि. व.

तत्त्ववित् तत्व जाणणारा तत्त्वविद् पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

गुणाः इन्द्रिये गुण पु. प्र. ब.व.

गुणेषु त्या त्या गुणांनी गुण पु. स. ब.व.

वर्तन्ते प्रवृत्त होतात वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

इति असे अव्यय

मत्वा मानून मन् धातू क्त्वा प्रत्यय

न सज्जते आसक्त होत नाही सस्ज् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

सांख्यदर्शनानुसार सत्त्व, रज आणि तम हे त्रिगुण जेव्हा साम्यावस्थेत असतात, त्या अवस्थेलाच प्रकृती हे नाव आहे

सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृति:| सांख्यसूत्र 1.61

आतापर्यंतच्या श्लोकातून आपल्याला ज्ञानी आणि अज्ञानी माणसांतील फरक वाचायला मिळाले. आधीच्या श्लोकात अहंकारविमूढात्मा असा शब्द वापरला होता.

गुणांपासून आत्मा वेगळा आहे तसाच तो कर्मांपासूनही निराळा आहे, हे जो जाणतो तो तत्त्ववेत्ता. कर्मेन्द्रिये आणि ज्ञानेन्द्रिये हि तर उपभोग घेण्याची साधने. 2र्या अध्यायातील 45-48 ह्या श्लोकात ह्या सर्वांचा उल्लेख करून श्रीभगवानकृष्णांनी समत्व योगा बद्दल सांगितले आहेच. त्रिगुणांची विस्ताराने माहिती पुढिल अध्यायात येईलच. सत्व रज आणि तम गुणांच्या कमीअधिक मात्रेमुळे व्यक्तीविशेष दिसून येतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे महा-बाहो! गुण आणि कर्म ह्या विभागांना तत्वतः जाणणारे ज्ञानी पुरुष गुण त्या त्या ठिकाणी प्रवृत्त होत असतात हे जाणून त्यामध्ये गुंतून पडत नाहीत.

---

प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु। तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत्।।3.29।।

प्रकृतेः गुण-सम्मूढाः गुण-कर्मसु सज्जन्ते अकृत्स्नविदः तान् मन्दान् कृत्स्नवित् न विचालयेत् ।

प्रकृतेः प्रकृति च्या प्रकृति स्त्री ष. ए. व.

गुण-सम्मूढाः गुणांनी मोहग्रस्त गुण-सम्मूढ पु. प्र. ब. व.

गुण-कर्मसु गुणांनी प्रभावीत कार्ये गुण कर्मन् नपु. स. ब. व.

सज्जन्ते आसक्त होतात सञ्ज् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

अकृत्स्नविदः अपूर्ण ज्ञान असणारे न कृत्स्नविद् पु. प्र. द्वि . ब. व.

तान् त्यात तद् पु. द्वि. ब. व.

मन्दान् अल्पबुद्धि मन्द पु. द्वि. ब. व.

कृत्स्नवित् ज्ञानी कृत्स्नविद् नपु. प्र. ए. व.

न विचालयेत् व्याकुळ होऊ नये वि+चल् धातू +णिच् प्रत्यय कर्तरि विधीलिङः आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

श्रीमद्भगवद्गीतेचा अभ्यास करताना काही गोष्टी प्रकर्षाने जाणवतात. संपूर्ण गीतेत जाती आणि धर्म यांचा मुळीच उल्लेख नाही. धर्म नाही त्यामुळे अर्थातच धर्माचा प्रसार आणि धर्मगुरू अशा कल्पना

नाहीत. पंचमहाभूतांचा उल्लेख स्पष्टपणे केलेला असून त्यांच्या देवतांचा उल्लेख आहे जसे इन्द्र देव. सूर्यदेव वगैरे. आपण पंचमहाभूतांचा म्हणजेच पर्यावरणाचा आदर करावा असे स्पष्ट सुचवले आहे. परमेश्वराप्रती कृतज्ञता व्यक्त करताना त्याची भक्तीपूजा करावी, असे करताना पान फूल पाणी अशा गोष्टी अर्पण केल्या तरी पुरे असेच म्हटले आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे आपल्यामधे दैवी गुण असावेत म्हणजेच आपली वागणूक चांगली असावी असे सुद्धा म्हटले आहे. अर्थातच दुर्गुणी व्यक्ती समाजाचा एक भागच आहेत असे म्हटले आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे अशा दुर्जनांना उपदेश करावा असे सुचवलेले नाही, मात्र प्रत्येकाने आत्मज्ञानी असावे असे म्हटले आहे. थोडक्यात ज्ञानी व्यक्तीने समाजिक सुधार करण्याचे कर्तव्य आपणास दिले आहे असे अजिबात समजू नये मात्र इतरांना जमेल तशी मदत करून त्याच्या श्रेयाची अपेक्षा ठेवू नये असे वारंवार सांगितले आहे. 26 व्या श्लोकात आदर्श मार्गदर्शक कसा असावा ह्याचे वर्णन आपण वाचले. प्रत्येक जण आपापल्या गतीने ज्ञान प्राप्त करत असतो हे सुद्धा सांगण्याचा प्रयत्न दिसून येतो.

म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की प्रकृति च्या गुणांनी मोहित असल्याने गुणांनी प्रभावित कर्मे करणाऱ्या अज्ञानी आणि अल्पबुद्धिंना ज्ञानी व्यक्तीने विचलित करू नये.

---

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा।

निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः।।3.30।।

अध्यात्मचेतसा मयि सर्वाणि कर्माणि संन्न्यस्यनिराशितः निर्ममः विगतज्वरः भूत्वा , युध्यस्व

अध्यात्मचेतसा अधि+आत्म चेतस् नपु. तृ. ए. व.

मयि माझ्यात अस्मद् स. ए. व.

सर्वाणि सर्व नपु. द्वि. ब. व.

कर्माणि कर्मन् नपु. द्वि. ब. व.

संन्न्यस्य त्यागून सम+नि+अस् धातू फेकणे ल्यप प्रत्यय

निराशीः निरीच्छ निर आशिस् स्त्री.प्र. ए. व. अस् धातू फेकणे

निर्ममः अहंकारविरहीत ममतारहीत निर+मम पु. प्र. ए. व.

विगतज्वरः निश्चिंत होऊन विगतज्वर पु. प्र. ए. व.

वि+गम् धातू जाणे +ज्वर धातू ताप होणे

भूत्वा होऊन भू धातू होणे क्त्वा प्रत्यय

युध्यस्व युद्ध कर युध् धातू कर्तरी लोट लकार आत्मनेपदी म. पु. ए. व.

लढायला सिद्ध झालेला योद्धा आत्मविश्वासाने परीपूर्ण, जिंकण्यासाठी स्वतः चे शौर्य दाखवण्यास उत्सुक असा असायला हवा. ह्या श्लोकात मात्र श्रीभगवानकृष्णांनी काही वेगळाच प्रस्ताव मांडला आहे. कर्म नक्की कसे करायचे ह्याचा जणू पाठच सांगितला आहे. तिसऱ्या अध्यायातील आतापर्यंतच्या श्लोकातून ज्ञानी व्यक्तीने अहंकारविरहीत असावे. सर्व कर्मे निष्ठापूर्वक करून ती परमेश्वराला अर्पण करावी, सम्यक आचरण करून दुसऱ्यांसाठी पाठ घालून द्यावा असे सर्व आपण वाचले. ह्या श्लोकातील 'अध्यात्मचेतसा ' ह्या शब्दाचा अर्थ विवेकबुद्धी, ब्रह्म जाणणारा.

द्व्यक्षरस्तु भवेन्मृत्युः त्र्यक्षरं ब्रह्म शाश्वतम् ।

ममेति तु भवेन्मृत्युः न ममेति च शाश्वतम् ॥महाभारतम् शान्तिपर्व 24.22।।

दोन अक्षरी शब्द 'मम' हा मृत्यू आहे तीन अक्षरी शब्द 'न मम' हा शाश्वत आहे.

युद्धात आपल्या हाती मारल्या गेलेल्या योद्ध्यांची जबाबदारी आता अर्जुनावर नाही. युद्ध कर्तव्य आता परमेश्वराला समर्पित केले आहे. त्यानंतर संन्यस्य हा शब्द वापरला आहे म्हणजे जे समर्पित करण्यासारखे नाही त्याचा पूर्णपणे त्याग करायचा आहे. जसे विजय प्राप्त झाल्यानंतर आनंद, अभिमान सुद्धा बाळगायचा नाही. असे निरीच्छ, निश्चिन्त आणि भावनारहीत होऊन युद्ध करायचे आहे. असेही म्हणता येईल की पूर्ण एकाग्र होऊन इतर कसलाच विचार न करता युद्ध करायचे आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

तू विवेकबुद्धीने सर्व कर्मे मला अर्पण करून, त्यागी वृत्तीने, निरीच्छ, अहंकार रहीत आणि निश्चिन्त होऊन युद्ध कर.

---

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः।

श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥3.31॥

ये मानवाः अनसूयन्तः श्रद्धावन्तः मे इदम् मतम् नित्यम् अनुतिष्ठन्ति , ते अपि कर्मभिः मुच्यन्ते ।

ये जो यद् पु. प्र. ब.व.

मानवाः मानव पु. प्र. ब.व.

अनसूयन्तः दोषमुक्त दृष्टीने न असूय शतृ प्रत्यय पु. प्र. ब.व.

श्रद्धावन्तः श्रद्धापूर्वक श्रद्धावत् पु. प्र. ब.व.

मे माझ्या अस्मद् ष. ए. व.

इदम् ह्या इदम् नपु. द्वि. ए. व.

मतम् मताचा मत नपु. द्वि. ए. व.

नित्यम् नेहमी नित्य नपु. द्वि. ए. व.

अनुतिष्ठन्ति अनुसरण करतात अनु+स्था धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

कर्मभिः कर्मांपासून कर्मन् नपु. तृ. ब. व.

मुच्यन्ते मुक्त होतात मुच् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी 'माझे मत' असा उल्लेख आहे. ह्याचा काय अर्थ घ्यायचा, (दुसऱ्याचे दुसरे मत असू शकते) विचार करायला वाव आहे. तसेच त्यांनी श्रद्धावत् होण्यास सांगितले आहे. येथे अंधश्रद्धा वगैरे असण्याचा काही प्रश्न येत नाही कारण प्रत्येक व्यक्तीने ज्ञानी आणि आत्मनिर्भर असणे अपेक्षित आहे असे म्हटले आहेच. श्रद्धा ठेवून मार्गक्रमण केल्यास सन्ताप, काम, लोभ, ईर्ष्या, मोह अशा भावनापासून दूर राहता येईल. कर्मांपासून मुक्ती हेच अंतिम लक्ष्य आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की जे लोक श्रद्धापूर्वक दोषरहित दृष्टिने माझ्या मताचे (आतापर्यंत सांगितलेल्या) नेहमी अनुसरण करतात ते सुद्धा कर्मबंधनातून मुक्त होतात.

---

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम्।

सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः।।3.32।।

ये तु अभ्यसूयन्तः मे एतत् मतम् न अनुतिष्ठन्ति, तान् अचेतसः सर्व-ज्ञान-विमूढान् नष्टान् विद्धि।

ये जे यद् पु. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

अभ्यसूयन्तः आसूया ठेवून अभि+असूय शतृ प्रत्यय पु. प्र. ब. व.

मे माझ्या अस्मद् ष. ए. व.

एतत् ह्या एतद् नपु. द्वि. ए. व.

मतम् मताचे मत नपु. द्वि. ए. व.

न अनुतिष्ठन्ति, अनुकरण करत नाही अनु +स्था धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

तान् त्या तद् पु. द्वि. ब. व.

अचेतसः मूर्ख न चेतस् नपु. प्र. ब. व.

सर्व-ज्ञान-विमूढान् सर्व ज्ञानावर मोहाने ग्रासलेल्या सर्व-ज्ञान-विमूढ पु. द्वि. ब. व.

नष्टान् नाशवंत नश् धातू क्त प्रत्यय पु द्वि. ब. व.

विद्धि जाण विद् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

ह्या श्लोकाचा अर्थ धमकीवजा उपदेश आहे असा समज करून घेण्याचे काहीही कारण नाही. कारण आतापर्यंत निःस्पृह, निस्वार्थी अहंकार रहीत वृत्तीने आपले नेमून दिलेले कर्म करून मोहग्रस्त असू नये असे हिताचेच उपदेश केले आहेत. अगदी साधे जगण्याचे नियम म्हणून जरी ह्याकडे पाहिले तर ते पाळणाऱ्याचे नुकसान नक्की होणार नाही.

आदी शंकराचार्यांनी म्हटल्या प्रमाणे

"गुरु वेदान्त वाक्येषु दृढो विश्वास"  'श्रद्धा गुरु आणि धार्मिक ग्रंथातील वचनांवर दृढ़ विश्वास' आहे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे सांगत आहेत की

परन्तु जे माझ्या या मतानुसार अनुकरण करत नाहीत ते अज्ञानी, सर्व ज्ञानावर मोहाचे सावट असलेले विनाशाकडे जात असतात हे तू समजून घे.

---

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि। प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति।।3.33।।

भूतानि प्रकृतिम् यान्ति। ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशम् चेष्टते। निग्रहः किम् करिष्यति ?

भूतानि समस्त जीव भूत नपु प्र. ब. व.

प्रकृतिम् प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

ज्ञानवान् ज्ञानवत् पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

स्वस्याः स्वतःच स्वा स्त्री. ष. ए. व.

प्रकृतेः प्रकृति च्या गुणांनुसार प्रकृति स्त्री ष. ए. व.

सदृशम् तदनुसार सदृश नपु. द्वि. ए. व.

चेष्टते प्रयत्न करतो चेष्ट् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

निग्रहः जिद्द निग्रह पु. प्र. ए. व.

किम् का किम् नपु. द्वि. ए. व.

करिष्यति करायचे कृ धातू कर्तरि लृट लकार प्र. पु. ए. व.

प्रत्येक प्राण्याचा एक विशिष्ट स्वभावविशेष दिसून येतो जसे कुत्रा प्रामाणिक तर कोल्हा लबाड, मुंगी कष्टाळू वगैरे. तशी माणसे एकाच स्वभावाची नसतात. माणसांमधे अनेक वैविध्यपूर्ण सवयी आणि लकबी दिसून येतात. ह्यामागे त्याचे संस्कार आणि शिक्षणाचा पण वाटा असतोच. कधी कधी विद्वान

माणसे सुद्धा आपल्याला चमत्कारिक वागताना दिसतात. आधीच्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण म्हणाले होते की त्यांच्या मतानुसार जे अनुसरण करतात ते कर्मबन्धनातून मुक्त होतात आणि जे तसे करत नाहीत ते विनाशाकडे जातात. प्रश्न असा आहे की प्रत्येकालाच त्यांनी सांगितल्याप्रमाणे वागायला जमेल का? तर त्याचे उत्तर अर्थातच नाही असे आहे. त्यावर स्पष्टीकरण म्हणजे हा श्लोक.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

सर्व सजीव आपापल्या व्यक्तीवैशिष्ठ्यांप्रमाणे वागतात. ज्ञानी पुरुष सुद्धा त्यांच्या स्वभावाप्रमाणे वागतात. मग हठवादी पणा कशाला करायचा?

---

इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ। तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ।।3.34।।

इन्द्रियस्य-अर्थे इन्द्रियस्य राग-द्वेषौ व्यवस्थितौ, तयोः वशम् न आगच्छेत् । हि तौ अस्य परिपन्थिनौ

इन्द्रियस्य इन्द्रियाचे इन्द्रिय नपु. ष. ए. व.

अर्थे विषय अर्थ पु. स. ए. वह

इन्द्रियस्य इन्द्रियाचे इन्द्रिय नपु. ष. ए. व.

राग-द्वेषौ राग आणि द्वेष राग द्वेष पु. प्र. द्वि. व.

व्यवस्थितौ नियमबद्ध व्यवस्थित वि+अव+स्था धातू क्त प्रत्यय पु. प्र. द्वि. व.

तयोः त्यांचे तद् पु. ष. द्वि. व.

वशम् वश पु. द्वि. ए. व.

न आगच्छेत् येऊ नये आङः गम धातू कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

हि म्हणून अव्यय

तौ ते तद् पु. द्वि. ए. व.

अस्य याचे इदम् पु. ष. ए. व.

परिपन्थिनौ मार्गातील अडथळे परिपन्थिन् पु. द्वि. ए. व.

परि+पथ् धातू

मनाला अतिशय भावणारा श्लोक. बाह्य संघर्ष हा खरे तर परीणाम असतो जो आपल्या मधल्या संघर्षातून निर्माण होतो.कौरवांशी युद्ध करण्यासाठी अर्जुनाला तयार करता करता श्रीभगवानकृष्ण आता आपल्या आतमध्ये असणाऱ्या शत्रूंशी लढायला सांगत आहेत. आपल्या मनात चालू असणाऱ्या संघर्षाचे सर्वजण समर्थन करतात पण ते चूक की बरोबर हे कसे ठरवायचे? त्यावर एक छान श्लोक वाचायला मिळतो.

"श्रूयतां धर्मसर्वस्वं श्रुत्वा चैवावधार्यताम् । आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत् ।।" पद्मपुराण सृष्टि 19-35556।।

लोकहो! तुम्ही धर्माचे सार जाणून घ्या. जी गोष्ट आपल्याला नकोशी वाटते ती तुम्ही दुसऱ्यांच्या बाबतीत करू नये. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

प्रत्येक इन्द्रियाचे प्रिय आणि अप्रिय असे विषय आहेत. मात्र आपण त्यांच्या प्रभावाखाली आले नाही पाहिजे. कारण ते आपल्या मार्गातील अडथळे आहेत.

---

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।।3.35।।

स्वनुष्ठितात् परधर्मात् विगुणः स्वधर्मः श्रेयान् । स्वधर्मे निधनम् श्रेयः । परधर्मः भय-आवहः

स्वनुष्ठितात् संपादित केलेला स्व +अनुष्ठित पु. पं. ए. व.

स्व+अनु +स्था धातू परधर्मात् परधर्मापेक्षा परधर्म पु. पं. ए. व.

विगुणः वैगुण्य युक्त विगुण पु. प्र. ए. व.

स्वधर्मः स्वधर्म पु. प्र. ए. व.

श्रेयान् लाभदायक श्रेयस् पु. प्र. ए. व.

स्वधर्मे स्वधर्मात स्वधर्म पु. स. ए. व.

निधनम् मरण निधन नपु. प्र. ए. व.

श्रेयः श्रेयस्कर श्रेय पु. प्र. ए. व.

परधर्मः परकिय धर्म परधर्म पु. प्र. ए. व.

भय-आवहः भय उत्पन्न करणारा भयावह पु. प्र. ए. व.

भयम आवहति

'धर्मो रक्षति रक्षितः' मनुस्मृति 8.15 जे धर्माचे रक्षण करतात त्यांना धर्माचे संरक्षण दिले जाते". क्षत्रियाचा धर्म आहे युद्ध करणे, आणि इतरांचे रक्षण करणे त्याला अहिंसेच्या मार्गाने जाता येईल का? आपल्या समाजात अशा अनेक जाती आहेत ज्या व्यवसायामुळे ठरल्या आहेत. आणि त्यात वावगे काहीच नाही. प्रत्येकाने आपापले काम निष्ठापूर्वक करणे हाच धर्म. फाशी देणारा किंवा युद्धात शत्रूला मारणाऱ्या सैनिकाला आपण खुनी म्हणू शकतो का?

विधर्मः परधर्मो च आभास उपमा चलः अधर्मसखाः पञ्चेमा धर्मज्ञोऽधर्मवत् त्यजेत् ।। श्रीमद्भागवत। 7.15.12।।

अधर्माचे 5 प्रकार आहेत. विधर्म, परधर्म, उपमा, छल,आभास धर्म जाणणारा अधर्मा प्रमाणेच अशा धर्मांचा सुद्धा त्याग करतो.

(1. विधर्म- जे कर्म धर्मबुदधीला अनुसरून केले असता, धर्माच्या विरोधी ठरते तो विधर्म.

2. परधर्म- कोणीतरी दुसऱ्याच कोणाला तरी केलेला उपदेश म्हणजे परधर्म.

3. दाम्भिकतेने केलेले कर्म हे उपकर्म किंवा उपमा आहे.

4. शास्त्रीय वचनांचा आपल्या सोयीनुसार अर्थ काढून केलेले कर्म म्हणजे छल.

5. आपल्या स्वभावाच्या विपरीत अशा कर्मांचा धर्म मानणे म्हणजे आभास.)

आपल्याकडे नसलेल्या कौशल्याने आपण चांगले काम करू शकणार नाही हे अमान्य होण्यासारखे नाही. ह्या श्लोकातील स्व अनुष्ठित मधील स्व चा अर्थ स्वयं असा आहे. म्हणजे स्वतः च्या व्यक्तीमत्वाला शोभेल असे कर्म.

1ल्या अध्यायातील 36 व्या श्लोकात युद्ध केल्यास आम्हाला पापच लागेल, 2र्या अध्यायातील 5 व्या श्लोकात भिक्षा मागून जगणे बरे ह्या अर्जुनाच्या वक्तव्यावर ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांकडून त्याचे उत्तर दिले आहे. ते असे म्हणतात की

दुसऱ्याच्या धर्माचे अनुकरण करण्यापेक्षा स्वतःच्या कमी प्रतीच्या धर्माचे पालन करणे श्रेयस्कर. स्वतः च्या कर्तव्याचे पालन करताना मरण आले तरी श्रेयस्कर पण दुसऱ्याचे नेमून दिलेले कर्म आपण करणे हे भीती उत्पन्न करणारे आहे.

---

अर्जुन उवाच

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः।

अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः।।3.36।।

अर्जुन उवाच - अथ हे वार्ष्णेय ! अयं पुरुषः अनिच्छन् अपि बलात् इव केन प्रयुक्तः नियोजितः , पापम् चरति?

अर्जुन उवाच -

अथ तर मग अव्यय

हे वार्ष्णेय ! वृष्णिकुलोत्पन्न कृष्णा

अयं हा इदम् पु. प्र. ए. व.

पुरुषः मनुष्य पुरूष पु. प्र. ए. व.

अनिच्छन् इच्छा नसताना अन् इच्छन् न+इष् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

बलात् बळेच बल नपु. पं. ए. व.

इव अव्यय

केन कोणाच्या किम् पु. तृ. ए. व.

प्रयुक्तः प्रेरीत होऊन प्र+युज् औधातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

नियोजितः नियुक्त नि+युज् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

पापम्  पाप नपु. द्वि. ए. व.

चरति करतो चर् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आता आधीच्या श्लोकातील श्रीभगवानकृष्णांचे बोलणे ऐकून अर्जुनाला सहाजिकच प्रश्न पडला आहे.

आपल्या हातून पाप घडणे हे दोन प्रकारे होत असते. जसे सज्जन व्यक्तीच्या नकळत काही चुकीचे वर्तन घडते आणि दुसरे जाणूनबुजून केलेली कृती. जसे चोरी लूटमार अत्याचार भ्रष्टाचार.

जानामि धर्मं न च मे

प्रवृत्तिर्जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः।केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि।। (गर्गसंहिता अश्वमेध० 50। 36)

दुर्योधन असे म्हणत आहे की

'मला धर्म माहित आहे , पण मला तसे वागावेसे वाटत नाही. मला अधर्म सुद्धा माहित आहे, पण मला त्यापासून लांब राहता येत नाही. माझ्या मध्ये काहितरी अशी शक्ती आहे जी मला असे वागायला भाग पाडते आणि मी तसेच वागतो.'

अर्जुन नेमका हाच प्रश्न विचारत आहे. गुन्हेगारी प्रवृत्तीचे अध्यात्मिक अंगाने दिलेले उत्तर. देहभान विसरणे, मती गुंग होणे, भुरळ पडणे असे वाक्प्रयोग आपण वाचतो. ते नेमके काय आहे? त्याचे विवेचन पुढे येईलच.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना प्रश्न विचारत आहे. तो असे म्हणतो की

हे वृष्णिवंशजा मनुष्याच्या मनात नसताना कशाच्या जोरावर तो पापकृत्य करण्यास प्रेरीत होतो?

---

श्री भगवानुवाच

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।

महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।।3.37।।

श्रीभगवानुवाच - एषः रजः गुण-समुद्भवः एषः कामः, क्रोधः महा-अशनः महा-पाप्मा एनम् इह वैरिणम् विद्धि।

श्रीभगवानुवाच -

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

रजः गुण-समुद्भवः रज गुणातून उत्पन्न झालेला

रज गुण-समुद्भवः पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए. व.

कामः कामरूप काम पु. प्र. ए. व.

क्रोधः क्रोध रूपी क्रोध पु. प्र. ए. व.

महा-अशनः खादाड महत् अशन पु. प्र. ए. व.

महा-पाप्मा महापापी महत् पाप्मन् पु. प्र. ए. व.

एनम् ह्याला इदम् पु. द्वि. ए. व.

इह इहलोक अव्यय

वैरिणम् शत्रू वैरिन् पु. द्वि.. व.

विद्धि जाण विद् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात अर्जुन विचारता झाला की ती कोणती शक्ती आहे ज्यामुळे मनुष्य आपल्या मनाविरुद्ध पापकर्म करण्यास प्रवृत्त होतो? ते सर्व आपल्या मधलेच दोष आहेत जे आपले शत्रू आहेत. ह्या श्लोकात काम हा शब्द वापरला आहे त्याचा अर्थ फक्त वासना असा नसून लालसा असा घ्यायला हवा. आपल्या इच्छा पूर्ण झाल्या नाहीत तर क्रोध उत्पन्न होतो. स्पर्धात्मक युगात किती पातळीपर्यंत स्पर्धा करावी ह्याचे काही मोजमाप नाही पण त्याचे दुष्परिणाम वेळीच ओळखले पाहिजेत.

यत् पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः। न दुह्यन्ति मन:प्रीतिं पुंसः कामहतस्य ते ।।श्रीमद्भागवतम्-9.19.13 ।।

कामी व्यक्ती ह्या जगात धन धान्य पशू स्त्री ह्याचा उपभोग घेऊन सुद्धा मनाने संतुष्ट होऊ शकत नाही (म्हणून आपल्या इच्छा आकांक्षांचाच त्याग केला पाहिजे.)

ह्या श्लोकात क्रोध हा आपला सर्वात मोठा शत्रू असे म्हटले आहे. क्रोध ग्रस्त व्यक्ती पाप करण्यास प्रवृत्त होतो. क्रोधाला अग्नी ची उपमा दिली आहे. क्रोधाग्नि सर्व काही भक्षण करतो.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

श्रीभगवानकृष्ण म्हणाले

रजोगुणांतून उत्पन्न झालेल्या आशाआकांक्षा ह्या क्रोध उत्पन्न करतात जे सर्व काही गिळंकृत करणाऱ्या आणि महापापी आहेत. ह्या लोकांतील शत्रू तू जाण.

---

धूमेनाव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च। यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्।।3.38।।

यथा धूमेन वह्निः , मलेन च आदर्शः , आव्रयते , यथा उल्बेन गर्भः आवृतः , तथा तेन इदम् आवृतम्।

यथा जसे अव्यय

धूमेन धूराने धूम पु. तृ ए. व.

वह्निः अग्नी वन्हि पु. प्र. ए. व.

मलेन धूळीने मल पु. तृ ए. व.

च सुद्धा अव्यय

आदर्शः आरसा आदर्श पु. प्र. ए. व.

आव्रियते झाकले जातात आङः वृ धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

यथा जसे अव्यय

उल्बेन गर्भाच्या बाजूच्या आवरणाने नपु. तृ ए. व.

गर्भः गर्भ पु. प्र. ए. व.

आवृतः झाकला जातो आङः+वृ धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

तेन त्याने तद् पु. तृ ए. व.

इदम्  हे नपु. प्र. ए. व.

आवृतम् झाकलेले असते आङः+वृ धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

ह्या श्लोकात दिलेल्या उपमांचा आता अध्यात्मिक अंगाने विचार करायला हवा कारण आता आधीच्या श्लोकात त्रिगुणांचे सूतोवाच करून झाले आहे. राजसी तामसी आणि सात्विक गुणांची व्यक्तीवैशिष्ठे दिसून येतात. तेन इदम् ह्या शब्दांचा अर्थच आधीच्या श्लोकांशी संदर्भ दर्शवितात. आपल्या विवेक बुद्धीवर असणारे माया शक्ती चे आवरण आपल्याला योग्य विचार करू देत नाहीत. आधीच्या श्लोकात आपल्या कामेच्छा कमी किंवा नष्ट केल्या पाहिजेत असे म्हटले होते. राजसि व्यक्तीला अग्नी ची उपमा दिली आहे असे म्हटले तर अग्नी प्रत्येक गोष्ट गिळंकृत करतो आणि तरी त्याचे समाधान होत नाही. धूरामुळे कदाचित अग्नी प्रत्यक्ष दिसून आला नाही तरी तो आतल्या आत धुमसत असतोच. तामसी वृत्तीच्या व्यक्तीला आरशाची उपमा दिली आहे असे म्हटले तर त्यावर जमा झालेली धूळ वाऱ्याचा झोत पुसुन टाकू शकत नाही. ती त्याला स्वतः स्वच्छ करावी लागते. सात्विक व्यक्तीला गर्भाची उपमा दिली आहे असे म्हटले तर जोपर्यंत गर्भाची वाढ पूर्ण होत नाही म्हणजे ती व्यक्ती पुरेशी प्रगल्भ होत नाही तोपर्यंत त्याच्या बुद्धीवर मायेचे आवरण असते. गर्भाची वाढ पूर्ण झाली की आवरण आपोआप गळून पडते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जसे अग्नी धूरामुळे, आरसा धूलीकणांमुळे आणि गर्भ गर्भाशयात झाकलेला असतो तसेच हे (ज्ञान/विवेकबुद्धी) झाकलेली असते.

---

आवृत्तं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा। कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणलेन च।।3.39।।

हे कौन्तेय ! दुष्पूरेण कामरूपेण अनलेन नित्यवैरिणा एतेन च ज्ञानिनः ज्ञानम् आवृतम् ।

हे कौन्तेय !

दुष्पूरेण अतृप्त दुष्पूर नपु. तृ ए. व.

पुर धातू पूर्ण करणे

कामरूपेण कामेच्छा कामरूप नपु. तृ ए. व.

रूप धातू रचना करणे

अनलेन अग्नीने अनल पु. तृ ए. व.

नित्यवैरिणा नित्य वैरी नित्यवैरिन् नपु. तृ. ए. व.

एतेन ह्याने एतद् नपु. तृ ए. व.

च सुद्धा अव्यय

ज्ञानिनः ज्ञानी पुरुषाची ज्ञानिन् पु. ष. ए. व.

ज्ञानम् विवेकबुद्धी ज्ञान नपु. द्वि. ए. व.

आवृत्तम् झाकलेली आङः+वृ धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

आतापर्यंत कामना आणि क्रोध अशा दोन शत्रूंचा उल्लेख जरी केला असला तरी मुख्य शत्रू कामनाच. कामना पूर्ण झाली नाही तर क्रोध उत्पन्न होतो. पण मुळात कामना संपतच नाही. उपभोग आणि संग्रह करण्याची इच्छा कधीही संपत नाही. जसे अग्नी सुद्धा आता पुरे! असे कधीच म्हणत नाही. जे मिळेल ते अग्नी भक्षण करतो. ह्या श्लोकात नित्यवैरी असा शब्द वापरला आहे म्हणजे शाश्वत शत्रू. आपल्या निरनिराळ्या लालसा ह्या आपल्या कायमस्वरूपी शत्रू आहेत.

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति।

हविषा कृष्णवर्तमेव भूय एवाभिवर्द्धते ॥ श्रीमद्भागवतम् 9.19.14॥

अग्नीत तूप घातल्याने अग्नी अजूनच वाढतो तसेच उपभोग घेतल्यावर सुद्धा आपली भोगी वृत्ती वाढतच जाते. (कमी होत नाही)

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जसे अग्नी सर्व काही भक्षण करून सुद्धा शांत होत नाही तसेच ज्ञानी माणसाची विवेकबुद्धी कायम स्वरूपी शत्रू असलेल्या कामेच्छांमुळे झाकोळलेली असते.

---

इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।

एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्।।3.40।।

इन्द्रियाणि मनः बुद्धिः अस्य अधिष्ठानम् उच्यते । एषः एतैः ज्ञानम् आवृत्य देहिनम् विमोहयति

इन्द्रियाणि इन्द्रिये इन्द्रिय नपु. प्र . ए. व.

मनः मन मनस् नपु. प्र. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री प्र. ए. व.

अस्य यांचे इदम् नपु. ष. ए. व.

अधिष्ठानम् वासस्थान अधिष्ठान नपु. प्र. ए. व.

उच्यते म्हणतात वच् धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

एषः हे एतद् पु. प्र. ए. व.

एतैः यांच्या द्वारे एतद् पु. तृ. ब. व.

ज्ञानम् ज्ञानाला ज्ञान नपु. द्वि. ए. व.

आवृत्य झाकतात आ+वृत् धातू ल्यप प्रत्यय

देहिनम् देहधारी ला देहिन् पु. द्वि. ए. व.

विमोहयति मोहित करतात वि+मुह् धातू णिच् प्रत्यय लट लकार प्र. पु. ए. व.

कामेच्छा हि आपली शत्रू आहे असे सांगून झाल्यावर जसे शत्रू महत्वाची ठाणी काबीज करतो तसेच आपल्या मधील हे शत्रू आपल्या शरीरातील महत्त्वाचे अवयव काबीज करतात.

कामबंधनमेवैकं नान्यदस्तिह बंधनम् |

कामबंधनमुक्तो हि ब्रह्मभूयाय कल्पते || महाभारत 12.243.7 ||

ह्या जगात केवळ कामना हे एकमेव बंधन आहे. जो ह्या बंधनातून मुक्त झाला तो ब्रह्मभाव प्राप्त करण्यास पात्र आहे.

यदा पञ्चवतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह। बुद्धिश्च न विचेष्टते तमहुः परमं गतिम् ॥कठोपनिषद् ।।2.3.10।।

जेव्हा पंचज्ञानेन्द्रिये मनासह शांत होतात आणि बुद्धि कार्य करायची थांबते तेव्हा त्या अवस्थेला परमगतीला म्हणतात.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

इन्द्रिये मन आणि बुद्धि ही कामेच्छांची निवासस्थाने आहेत असे म्हणतात. ही ज्ञानाला बाजूला सारून जीवात्म्याला मोहात पाडतात.

---

तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ।

पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्।।3.41।।

तस्मात् हे भरतर्षभ! त्वम्  आदौ इन्द्रियाणि नियमस्य , ज्ञान-विज्ञान-नाशनम्  एनं पापमानम्  हि प्रजाहि

तस्मात् म्हणून तद् पु. पं ए. व.

हे भरतर्षभ!

त्वम्  तू युष्मद् प्र. ए. व.

आदौ प्रारंभी आदि पु. स. ए. व.

इन्द्रियाणि इन्द्रिये इन्द्रिय नपु द्वि. ब. व.

नियमस्य नियमीत करून नि+यम धातू ल्यप प्रत्यय

ज्ञान-विज्ञान-नाशनम् ज्ञान आणि विज्ञानाचे विनाश करणारा ज्ञान-विज्ञान-नाशनम् पु. द्वि. ए. व.

एनम् या इदम् पु. द्वि. ए. व.

पाप्मानम्  महान पापी पाप्मान पु. द्वि. ए. व.

हि अवश्य अव्यय

प्रजहि मारून टाक प्र+हन् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

तरूण पिढीने आवर्जून वाचावा असा श्लोक. तरूणाई आणि विविध अपघात, व्यसनाधीनता यांचे अगदी जवळचे नाते आहे. प्रलोभनांपासून सुरवातीलाच लांब राहणे श्रेयस्कर.

ह्या श्लोकात ज्ञान आणि विज्ञान असे शब्द आले आहेत. गुरूच्या अनुग्रहाने, वेदशास्त्रांच्या पठणाने आत्म्याचे जे परोक्षज्ञान होते त्याला ज्ञान असे म्हणतात. याउप्पर जे अपरोक्ष ज्ञान होते जो फक्त स्वानुभव असतो त्याला विज्ञान असे म्हणतात.

ज्ञानं परमगुह्यं मे यद् विज्ञानसमन्वितम्।

सरहस्यं तदङ्गं च गृहाण गदितं मया ॥ श्रीमद्भागवतम्। 2.9.31 ॥

शास्त्रांमध्ये माझ्या विषयीचे ज्ञान गोपनीय असे आहे. ते भक्तिपूर्वक समजून घ्यायला हवे त्याची प्रक्रिया मी तुला सांगतो ती तू ध्यानपूर्वक ग्रहण कर.

निरनिराळी प्रलोभने हे आपल्या ज्ञान संपादन करण्याचा मार्गातील मोठे अडथळे असे आधीच्या श्लोकात सांगून झाल्यावर ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

म्हणून हे भरतर्षभ! तू ज्ञान आणि विज्ञान यांचा नाश करणाऱ्या महापापी अशा प्रलोभनांचा सुरवातीलाच नाश करून आपल्या इन्द्रियांवर अंकुश ठेव.

---

इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।

मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः।।3.42।।

इन्द्रियाणि पराणि आहुः , इन्द्रियेभ्यः परम  मनः , मनसः तु परा बुद्धिः , बुद्धेः यः तु परतः सः।

इन्द्रियाणि  इन्द्रिये इन्द्रिय नपु. प्र. ब. व.

पराणि श्रेष्ठ पर नपु. प्र. ब. व.

आहुः आहेत ब्रू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

इन्द्रियेभ्यः इन्द्रियांपेक्षा इन्द्रिय नपु. पं. ब. व.

परम श्रेष्ठ पर नपु. प्र. ब. व.

मनः मन मनस् नपु. प्र. ए. व.

मनसः मनापेक्षा मनस् नपु. पं. ए. व.

तु परन्तु अव्यय

परा श्रेष्ठ परा स्त्री. प्र. ए. व.

बुद्धिः , बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

बुद्धेः बुद्धि स्त्री. पं. ए. व.

यः यद् पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

परतः सर्वश्रेष्ठ अव्यय

सः तो (आत्मा) तद् पु. प्र. ए. व.

आधीच्या श्लोकात प्रलोभनांपासून इन्द्रियांवर नियंत्रण ठेवावे असे सांगितले होते पण खरे तर आपले मन ह्या सर्वांचा निर्णय करत असते. आपल्या कानाजवळ जरी कोणी बोलत असले तरी आपले लक्ष नसेल तर आपल्याला ते ऐकू येत नाही. परत सांग असे आपण सहज म्हणून जातो. तसेही एकेका इन्द्रियांमुळे एकाच विषयाचे ज्ञान होत असते जसे जीभेमुळे निरनिराळ्या चवी समजतात. अशा सर्व इन्द्रियांतर्फे अवगत झालेले ज्ञान आपण बुद्धीद्वारे मनात साठवून ठेवतो. म्हणजे मनापेक्षा बुद्धी श्रेष्ठ ठरते. अशाच अर्थाचा एक श्लोक इन्द्रयेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः।

मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥कठोपनिषद् 1.3.10

इन्द्रियांपेक्षा इन्द्रियांचे विषय श्रेष्ठ आहेत, त्यापेक्षा श्रेष्ठ आहे मन. मनापेक्षा श्रेष्ठ बुद्धि आहे आणि बुद्धि पेक्षा श्रेष्ठ आत्मा आहे.

महर्षी व्यासांनी आपल्या शरीराचे अगदी समर्पक वर्णन केले आहे. कर्मयोगाच्या ह्या शेवटच्या दोन श्लोकात महत्त्वाचे ज्ञान दिले ते म्हणजे आपले मन कामेच्छांमधे अडकलेले असेल तर ज्ञान आणि विज्ञानाचा मार्ग मोकळा होत नाही. आपण करत असलेले कर्म आपल्या बुद्धीला सुद्धा पटायला हवे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

(शरीरापेक्षा) इन्द्रिये श्रेष्ठ. इन्द्रियांपेक्षा मन श्रेष्ठ आहे, मनापेक्षा श्रेष्ठ बुद्धि आणि बुद्धि पेक्षा श्रेष्ठ आहे तो आपला आत्मा.

---

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना।

जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्।।3.43।।

एवम् बुद्धेः परम् बुद्ध्वा आत्मना आत्मानम् संस्तभ्य, हे महाबाहो! काम-रूपम् दुरासदम् शत्रुम् जहि

एवम् अशाप्रकारे अव्यय

बुद्धेः बुद्धि पेक्षा बुद्धि स्त्री पं. ए. व.

परम् श्रेष्ठ पर नपु. द्वि. ए. व.

बुद्ध्वा जाणून घेऊन बुध् धातू क्त्वा प्रत्यय

आत्मना आत्म्याने आत्मन् पु. तृ. ए. व.

आत्मानम् आत्म्याला आत्मन् पु. द्वि. ए. व.

संस्तभ्य, स्थिर करून सम+स्तम्भ् धातू स्थिर होणे ल्यप प्रत्यय

हे महाबाहो!

काम-रूपम् इच्छा स्वरूप कामरूप पु. प्र. ए. व.

दुरासदम् सापडण्यास कठीण असा दुरासद पु. द्वि. ए. व.

दुर्+आ+सद् धातू

शत्रुम् शत्रु पु. द्वि. ए. व.

जहि ठार कर हन् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

आत्मानां रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु। बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥कठोपनिषद् 1.3.3

आत्म्याला रथाचा स्वामी, शरीराला रथ, बुद्धी ला सारथी आणि मनाला लगाम समज.

इन्द्रियाणि ह्याणाहुर्विषयांस्तेषु गोचरान्।आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीशिणः ॥कठोपनिषद् 1.3.4

इन्द्रियांना ते घोडे (सहजप्रवृत्ती) म्हणतात. त्यांच्या मार्गांना विषय. शरीर इन्द्रिय आणि मन यांनी युक्त अशा त्या आत्म्याला बुद्धीमान भोक्ता म्हणतात.

ह्या अध्यायातील हा शेवटचा श्लोक म्हणजे अर्थातच सार सांगणारा. 2र्या अध्यायातील सांख्ययोग, कर्मयोगापेक्षा ज्ञानयोग श्रेष्ठ म्हणजे कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ असे ऐकल्यावर अर्जुनाने पहिल्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांना विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर येथे दिले आहे. कर्मयोगातील मेख जणू ह्या श्लोकात सांगितली आहे. जसे कामेच्छांना आपला शत्रू समजून त्याचा नाश करून आपण आपले कर्म केले पाहिजे.आत्मा हा बुद्धी पेक्षा सुद्धा श्रेष्ठ हे सुद्धा एक आत्मज्ञानच. मनाला स्थिर ठेवून कामरूपी शत्रूचा सर्वनाश केला पाहिजे. ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की अशा प्रकारे बुद्धि पेक्षा श्रेष्ठ आत्मा हे जाणून घेऊन आत्म्याला आत्म्यामधे स्थिर करून हे महा-बाहो! दुर्जय अशा कामरूपी शत्रू चा तू नायनाट कर.

हरि ॐ तत् सत्

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम्

योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवाददे

कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः

अशाप्रकारे, उपनिषदांत सांगितलेली महान भगवद्गीता   शाश्वत विज्ञान, योग शास्त्र,  श्रीकृष्ण आणि अर्जुनामधील संवाद असा तीसरा अध्याय समाप्त होतो ज्याचे शीर्षक आहे “कर्मयोग”.

